मीना प्रकाशन-४

# निखारा

( स्वतंत्र सामाजिक कादंबरी )

लेखकः—नारायण धोंडो उपाध्ये.

नोव्हेंबर १९३९

किंमत १-१२-०

# प्रस्तावना

रचनेच्या दृष्टीनें नाटकाइतकी कादंबरी नियमांनीं जखडली नसल्यानें कल्पक कादंबरीकाराला अद्यापि नवे नवे रचनेचे प्रकार शोधून रूढ करण्यास पुष्कळ वाव आहे असें आधुनिक पाश्चात्य साहित्यशास्त्रज्ञांचें मत आहे. किंबहुना नाटकाचें तंत्रशास्त्र जितक्या परिणतावस्थेस पोहोंचलें आहे तितकी परिणतावस्था कादंबरीच्या तंत्राला लाभली नाहीं असेंही म्हणतां येईल. हें विधान जरी खरें असलें तरी कोणत्याही भाषेंतील सर्वसामान्य ललित लेखकाची प्रवृत्ति नवीन रचनेचे प्रकार शोधून काढण्यापेक्षां प्रचलित-रूढ प्रकारांचाच अवलंब करण्याकडे असते—आणि निश्चित यश मिळविण्याच्या दृष्टीनें यांत कांहीं वावगें नाहीं. परंतु रूढ मार्गाचा अवलंब न करतां एकादा असामान्य प्रतिभा संपन्न ललित लेखक मोठ्या धैर्यानें स्वयंनिर्मित कलाविलास प्रकट करून रसिकांच्या प्रेमादरास पात्र होतो. अशा लेखकांच्या रांगेंत " निखारा " या लघुकादंबरीच्या कर्त्याला—म्हणजे श्री. ना. धों. उपाध्ये यांना जागा मिळावी असें वाटतें. " अभागिनीची डायरी " ही दीडदोन वर्षांपूर्वी प्रसिद्ध झालेली कादंबरी आणि " आर्थिक स्वातंत्र्य " हें नाटक, इतकीच साहित्यसेवा ज्या नवोदित लेखकाची, जनतेसमोर आहे, त्या लेखकाच्या बाबतींत वर केलेलें विधान अगदीं अवास्तव अविश्वसनीय आहे असें पुष्कळ वाचकाना वाटण्याचा संभव आहे. तथापि पूर्वग्रह न बाळगतां, समतोल मनानें प्रस्तुतची निखारा कादंबरी वाचल्यास मी म्हणतों त्यांत कांहींतरी तथ्यांश-सत्यांश आहे असें वाचकांच्या प्रत्ययास येईल. रा. उपाध्ये यांच्या कादंबरींतील सर्वच प्रसंग वर्णनें, विचार, तत्वें-वगैरे सर्व कांहीं मला मान्य आहे-असा मात्र याचा अर्थ नाहीं. उलट बव्हंशानें कादंबरींतील बऱ्याचशा भागांत-त्यांच्याशीं माझा तीव्र मतभेद आहे. अर्थात् तो स्वतंत्र मुद्दा आहे-आणि त्याचा परामर्ष घेण्याचें हें स्थळ नव्हे. " नाविन्य " या एकाच दृष्टीनें विचार करून वरील विधान केलेलें आहे.

सकृत्दर्शनी या कादंबरींत कांहींच नाविन्य नाहीं असें एकाद्या वाचकास वाटण्याचा संभव आहे. प्रत्येक पात्र स्वमुखानें आपली कथा निवेदन करतें, कित्येक आत्मवृत्तपर कादंबऱ्यांत एक प्रमुख पात्र आपली कथा सांगतें तर कित्येक कादंबऱ्यांत एकाहून अधिक पात्रें आपापल्या कथा सांगतात. या

कादंबरींत नायक व नायिका हीं दोन पात्रें आपापल्या कथा सांगतात; अर्थात् ही मोठी नाविन्यपूर्ण रीत आहे असें कोणीही म्हणणार नाहीं. एका किंवा अनेक पात्रानें स्वमुखानें हकीकत सांगणें ही कादंबरी-निवेदनाची किंवा मांडणीची एक पद्धत आहे. यांत अलौकिकत्वाचा—नाविन्याचा भाग कुठें असेल तर तो रचनेच्या बाबतींत आहे. कादंबरींत वर्णिलेल्या सर्व घटनांचा-प्रसंगांचा-कथानकाचा-साकल्यानें विचार केला तर फक्त दोनच दोन पात्रें घेऊन,-त्यांनींच स्वतः निर्माण केलेल्या घटना-क्रिया-प्रतिक्रिया-आघात-प्रत्याघात—एवढ्याच वस्तूवर सबंध कादंबरीचा वास्तु उभारला आहे. कादंबरीच्या सुरवातीच्या भागांत नायिकेच्या आईचा उल्लेख किंवा उत्तरार्धात "निना"चा उल्लेख हा उपेक्षणीय भाग वगळला तर कादंबरींतील सर्वच प्रसंग नायक-नायिकानिर्मित आहेत; त्यांत तिसऱ्या व्यक्तीचा-(अगदीं अपवादात्मक भाग सोडून) कांहीं हात नाहीं असें दिसून येईल. ही कादंबरी लिहितांना लेखकानें स्वतांवर किती बंधनें घालून घेतलीं होतीं हें यावरून दिसून येईल. दोन्हींशिवाय तिसऱ्या पात्राला कथानकाच्या घडणींत हात घालूं द्यावयाचा नाहीं, असें ठरल्यावर-कथानक किती सामर्थ्यहीन-निःसत्व आणि किरकोळ होईल याची सहज कल्पना करतां येईल. आणि कथानकाच्या दृष्टीनें पाहिलें तर या कादंबरींतील कथानक इतकें साधें-नेहमींच्या परिचयांतलें व वैचित्र्यहीन आहे कीं, कादंबरी लेखकानें हें असलें किरकोळ निःसत्व कथानक आपल्या कादंबरीचा विषय म्हणून निवडलें तरी कशाला असें कथावाचक विचारण्याचा संभव आहे-पण असल्या दुबळ्या-लंगड्या कथानकाला सारथि करून लेखकानें आपल्या प्रतिभेचा रथ वाङ्मयनभांत लोटला आहे. अरुणाचा लंगडेपणा सूर्याच्या गतीच्या आड कुठें येतो ?

रचना वर वर्णिलेल्या प्रकारची, कथानक अगदीं सरळ व साधें-कुठल्याही घडामोडी नाहींत, आणि पात्रें-म्हणजे दोन प्रेमी जीव—(मानसशास्त्रासारख्या विषयांत तल्लीन झालेले-अंतःर्मुख आणि विचारशील)—ही एवढी सामुग्री कोणत्याही लेखकाला हुरूप किंवा उमेद देण्यासारखी नाहीं हें कोणीही कबूल करील. पण रा. उपाध्ये यांनीं आपल्या रसाळ भावनोत्कट व ओघवती लेखनसरणीनें वाचकांचें औत्सुक्य अखेरपर्यंत कायम ठेवलें आहे हें त्यांच्या लेखनसामर्थ्याचें अचुक गमक नाहीं असें कोण म्हणेल ?

या कादंबरींतील दुसरा विशेष म्हणजे नायक व नायिका यांची वर्णिलेली मनःस्थिति होय. या प्रेमी जोडप्यांचीं मानसिक आंदोलनें इतक्या हळुवार हातानें आणि उत्कटतेनें वर्णन केलीं आहेत कीं त्यामुळेंच त्या पात्रांविषयीं वाचकाला सहानुभूति वाटतें. मनोविश्लेषणाच्या दृष्टीनें हा प्रयत्न खरोखरच यशस्वी आणि परिणामकारक झाला आहे. मानसिक आंदोलनें इतक्या अचुक रीतीनें, हळुवार हातानें रंगविणारे जे थोडे हाताच्या बोटावर मोजण्याइतके लेखक आहेत त्यांत रा. उपाध्ये यांची यापुढें गणना करावी लागेल. मात्र त्यांना एक प्रेमाची सूचना देणें जरूर आहे मानसशास्त्रांचें जें स्तोम त्यांनीं या कादंबरींत माजवलें आहे, त्याची कांहीं जरूर नव्हती. ललित लेखकानें यशस्वी रीतीनें पात्रांचीं स्वभाववर्णनें करण्यासाठीं मानस शास्त्रांतील पारिभाषिक संज्ञा वापरल्या पाहिजेत असें मुळींच नाहीं. दुसरें असें कीं शास्त्रीय विषयाचा आविष्कार ललितकलेच्या रूपानेंच करावयाचा म्हटलें तर केवळ्या प्रचंड प्रमाणावर ग्रंथनिर्मिति करावी लागेल याची कल्पना देखील करवत नाहीं. सुदैवानें रा. उपाध्ये यांनीं मानस शास्त्रांतील सिद्धांत कादंबरींतील निरनिराळ्या प्रसंगाला कसे लागू पडतात याचें विवेचन प्रारंभीचा अपवादात्मक भाग सोडला तर कुठें केलेलें आढळत नाहीं. प्रेमाचें तात्विक विवेचन कांहीं कांहीं ठिकाणीं लेखकानें मोठें समर्पक व पटण्यासारखें केलें आहे.

विषयाच्या दृष्टीनें पाहिलें तर कादंबरींतील तीन चतुर्थांस भाग अगदीं पराकाष्ठेचा वास्तव स्वरूपाचा आहे. अशा वास्तवप्रधान कथानकाला 'निना'च्या अद्भुत कथेची जोड कादंबरीच्या उत्तरार्धांत देऊन कादंबरीच्या परिणामकारकतेला बाध आणला आहे. तो भाग पूर्णपणें वगळला असता तरी कादंबरीची शोभा कोणत्याही प्रकारें कमी झाली नसती. उलट नायकाच्या स्वभाव चित्रणाला शेवटीं जें गौणत्व आलें आहे तेंही टळलें असतें. पण प्रतिपाद्य सिद्धांत, पहिलें प्रेम हेंच खरें प्रेम. त्या नंतरचें प्रेम हें खरें प्रेम नसून तो एक प्रकारचा उन्माद असतो–सिद्ध करण्याच्या दृष्टीनें त्यांनीं निनाच्या कथेची पुस्ती अखेरीला जोडली असावी.

वर उल्लेखिलेला–एका पाश्चात्य सुप्रसिद्ध साहित्यिकानें प्रतिपादलेला सिद्धांत–शास्त्रीय दृष्टीनें कितपत बरोबर आहे हा मोठा विचार करण्यासारखा प्रश्न आहे. मनुष्यमात्रानें एकदांच प्रेम करावें–किंवा–कोणत्याही व्यक्तीला खरें प्रेम एकदांच करतां येतें. त्यानंतरचें प्रेम हें खरें प्रेमच नव्हे–असले आत्यंतिक स्वरूपाचे

ध्येयनिष्ठ सिद्धांत शिरसावंद्य मानण्याचे दिवस आतां उरले नाहींत. ललित-वाङ्मयांत जें आत्यंतिक स्वरूपाचें प्रेम आपणास आढळतें-तें प्रेम खरोखरच आदरणीय व अनुकरणीय आहे कीं काय हा एक प्रश्नच आहे. प्रेमाची भावना उत्कट होऊन प्रेमिकाच्या मनाला फक्त प्रेमाचाच एक निदिध्यास लागला, कीं दुसऱ्या कोणत्याही गोष्टींत त्याला तथ्य वाटत नाहीं-आणि अशा रीतीनें त्याचें सर्व आयुष्य वायां जातें. मनाला पूर्णपणें ग्रासणारी कोणतीही भावना किंवा विकार प्रबळ झाला, कीं आयुष्याचा नाश होतो असा निष्कर्ष जॉन मेसफील्ड यांनीं शेक्सपिअरच्या शोकपर्यवसायी नाटकांवरून काढलेला आहे. इतर भावनेप्रमाणें प्रेमाच्या भावनेचा अतिरेक झाला, कीं त्याचा शेवट दुःखांतच व्हायचा हें निश्चित. आणि याच दृष्टीनें आधुनिक मानसशास्त्रज्ञही या प्रश्नाकडे पाहतात. कोणत्याही एकाच गोष्टीवर ज्यानें आपला जीव लावलेला असतो त्या मनुष्याची इच्छापूर्ति झाली नाहीं, कीं त्याला जगणें मोठें दुःसह होऊन जातें. तेव्हां सर्वसामान्य माणसानें आपल्या नेहमींच्या व्यवसायाशिवाय इतर अनेक गोष्टींत आपलें मन रमविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. दुसरें असें कीं प्रेम हा मनुष्याच्या जीवितांतील एक भाग आहे. तेव्हां केवळ प्रेमभंग झाला म्हणून, केवळ आयुष्यांतील एक भाग बिघडला म्हणून बाकी सर्व आयुष्य वायां घालवावयाचें हा कुठला न्याय ? याहून प्रेमाची अधिक चर्चा एथें करणें अप्रस्तुत होईल. तात्विक मतभेद कांहीं असलें तरी, या कादंबरींतील बहुतेक सर्व भागांतून प्रेमाचें जें भावनोत्कट स्वरूप प्रकट झालें आहे त्यावरून लेखकानें ठराविक साचाचें नकली वर्णन दिलेलें नसून जीवितांतील प्रत्यक्ष सत्यच आपणापुढें उभें केलें आहे कीं काय असा भास होतो. इतक्या तरुण वयांत एवढ्या आत्मविश्वासानें अभिनव रचनेचा उपक्रम पार पाडला याबद्दल रा. उपाध्ये यांचें मनःपूर्वक अभिनंदन करून त्यांच्या साहित्यसेवेंत त्यांना वाढतें यश व उत्कर्ष इच्छून ही प्रस्तावना पुरी करतों.

सोलापूर
ता. २९-११-३९

**पं. मा. कामतकर.**

# निवेदन



**निखारा**—हातांत घेऊन रसिकांच्या सेवेसाठीं आज मी उभा आहें. रसिकांकडून कौतुकानें माझ्या सेवेचा स्वीकार होईल अशी आशा आहे.

निरीक्षणशक्ति आणि कल्पनाशक्ति यांच्या मिश्रणाविना कादंबरी कुणालाही लिहितां येणं शक्य नाहीं. कादंबरींत चितारली जाणारी कथा निव्वळ काल्पनिक असणं शक्य नाहीं. बाजारांतल्या अनेक वस्तूंच्या मिश्रणानें सुगृहिणी जसा एकादा सुंदर, चवदार पदार्थ तयार करते, तद्वतच लेखकही आजुबाजूला वावरणाऱ्या निरनिराळ्या पात्रावलोकनानें कादंबरी लिहितो. जें जें ग्राह्य दिसेल, जें जें सुंदर दिसेल तेवढ्यांचाच फक्त उपयोग लेखक करीत असतो. तेव्हां अशा रीतीनें तयार झालेली कादंबरी वाचतांना कित्येकवेळीं वाचकाला 'हें चित्र माझें तरी नसेल, किंवा त्याचें तरी नसेल ?' अशी शंका उद्भवणें साहजिक आहे.—शंका उद्भवणें साहजिक असलें, तरी कोणी दुराग्रहाच्या आहारीं मात्र जाऊं नये अशी नम्र विनंति आहे.

प्रस्तुत कादंबरीचा पुढील कथाभाग "**कांटेरी-कुंपण**" या नांवें लिहून तयार आहे. लवकरच हीही कादंबरी प्रकाशित करण्याचें आश्वासन देऊन आणि ज्यानीं ज्यानीं मला याबावत प्रेमळपणें साहाय्य केलें त्या सर्व सुहृदांचे आभार मानून रजा घेतों.


**पांडुरंग वाडी, गिरगांव,**
**मुंबई नं. ४.**

सर्वांचा नम्र,
**ना. धों. उपाध्ये.**

# निखारा

## प्रकरण १ लें—मारायला गेला, पण स्वतः मेला

### चंद्रकांतानें लिहिलेली हकीकत

लांबच्या नात्यांतली, पण आमच्या घराशीं नित्य संबंध येत असलेल्या घराण्यांतली, माझ्यापेक्षां दीड-दोन वर्षें लहान असलेली, रूपानें फार उत्तमपैकीं नसली तरी साधारण—साधारणच कां? बरी-चशी—आकर्षक असलेली, वर्तनानें सच्छिल, मुग्धा, सुहास्यवदना 'शशिकला' या नांवाची एक तरुणी—हो, तरुणीच म्हणेन मी तिला. सतरा अठरा वर्षें वयाच्या मुलीला तरुणी म्हणूं नये कां?—होती.

'तिच्या—माझ्या घराचा वरचेवर संबंध येत असे,' असें मी म्हटलं आहे, पण तो संबंध चांगल्या तऱ्हेनीं येत असे अशांतला मुळींच भाग नाहीं. आमच्यांत आणि त्यांच्यांत कांहीं खाजगी बाबतींत मतभेद होता. त्या मतभेदाचें रूपांतर रागद्वेषादि भावनेंत होऊन कधीं मामुली खटकेही उडत असत.

व्यक्तिशः विचार करायचा झाला, तर या नेहमीं उडणाऱ्या 'मामुली' खटक्यांमुळें माझ्या स्वतःच्या आयुष्याचं बरंचसं नुकसान

झालं होतं. या नुकसानीची उणीव भरून काढण्यासाठीं--नुकसान भरपाईसाठीं—मी त्या घराण्याचा सूड घ्यावा अशा बेतांचे बंगले बांधूं लागलों.

आणि विचार करतां करतां सूड भावनेची पूर्तता होईल अशी मला आशा वाटूं लागली. आशेचा एक अंधुकसा किरण दिसला मला.

शशिकलेचं मन आपल्याकडे ओढून घ्यावं म्हणजे काम फत्ते झालेंच असं मला वाटलं, नव्हे; खात्रीच झाली माझी.

मी म्हणजे एक आईवडिलांविना वाढलेला मध्यमस्थितींतला गरीब तरूण. तरुण कसचा ? तारुण्याच्या पायरीवर पाय ठेवतों आहे सध्यां !

माझ्या गरीबी परिस्थितीमुळें मला शिक्षणासाठीं बरेच हाल सोसावे लागत. अती कष्ट करून जेमतेमच माझ्या शिक्षणाचा खर्च भागला जात असे. नानातऱ्हेच्या धंद्यांत प्रवेश करून आणि जीवापलीकडे श्रम करून मला माझा खर्च भागवावा लागे.

कारणें सांगत बसत नाहीं, पण शशीकलेच्या आईमुळेंच मला शिक्षण सोडणं भाग पडलं ! इंग्लिश पांचव्या ईयत्तेंत होतों, त्यावेळीं मी शिक्षण सोडलं. शाळा सोडली त्यावेळीं माझं वय १६ होतं.

जेमतेम शिक्षण झालेलं, तेव्हां हल्लींच्या धकाधकीच्या कालांत आणि बेकारीनें माजलेल्या जगांत आपला निभाव लागणं जरा कठीणच आहे हें त्याचवेळीं मला कळून आलं होतं.

सोळा वर्षांचं वय असलेल्या मुलाला हें जरी कळून आलं असलं तरी ‘पुढें करायचें काय ?’ हा प्रश्न तो कसा सोडविणार ? भवि-

तत्यतेचं भूत माझ्या मनाला इतकं भयंकर भडकपणें भेडसावूं लागलं, कीं त्या भीतीमुळेंच मला कांहीं काम करायला धैर्य होईना !

शाळा सोडलेली, उद्योग तर नाहींच ! नोकरी तरी देणार कोण माझ्यासारख्या लहान मुलाला ? आणि मला करतां येण्यायोग्य अशी नोकरी तरी कुठें शिल्लक असणार ? नोकरी नाहीं—शाळा नाहीं; दोन वेळां खायचं आणि गांवांतून भटकण्यांत इतर सारा वेळ घालवायचा असा त्यावेळचा माझा क्रम असे.

शशिकलेची आई फार खाष्ट स्वभावाची होती. तिच्या त्या लठ्ठ आणि कांहींशा बुटक्या शरीरयष्टीकडे पाहिलं, कीं एकप्रकारची विलक्षण भीतिच वाटे माझ्या मनाला—नव्हे, कुणालाही भीति वाटेल असाच तिचा चेहरा उग्र आणि तामसी होता. तिला कुठलीही एकादी गोष्ट आपल्या मनाप्रमाणें घडून आली नाहीं तर अतिशय राग येत असे अन् रागाच्या भरांत वाटेल तें बोलण्याला तिला कांहींच दिक्कत वाटत नसे. आपल्या बोलण्यामुळें ऐकणाराच्या मनावर इष्ट परिणाम होतो, कीं अनिष्ट परिणाम होतो याचा विचारच ती करीत नसे ! भरमसाट तोंडाचा पट्टा सोडायचा एवढंच ती जाणी—आणि आपलं हें कार्य ती उत्तम ( ! ) प्रकारें बजाविल्याशिवाय कधींच रहात नसे.

मी निरुद्योग्यासारखा गांवांतून भटकतों आहें हें तिला खपलं नाहीं. ती त्याबद्दल मला फार बोलत असे. वेळ प्रसंगीं माझ्या आई-वडिलांचाही उद्धार करण्यास ती कचरली नाहीं. "उनाड" हें विशेषण तर तिनें माझ्या नांवामागें कायमच केलं होतं.

मी निरुद्योगी राहूं नये, कुठें तरी नोकरी करावी हा तिचा हेतू स्तुत्य होता. मलाही तें पटत होतं—पण नोकरी ? होती कुठें शिल्लक नोकरी ? आणि असली तरी देणार कोण मला नोकरी ? आधींच दुर्मीळ असलेल्या आणि त्यांतही वशिलेबाजीनें माजलेल्या जगांत माझ्या सारख्या निराधार लहान वयाच्या मुलाला सहानुभूतीनें कोण नोकरी देणार ?—तरी पण मी खटपट करीत असें नोकरीची.

शिवाय माझ्या या वागण्यानेंच—माझ्या समोर जरी प्रत्यक्ष नसलं, तरी माझ्या पश्चात मला लोक 'उनाड' म्हणत हीही गोष्ट कांहीं खोटी नव्हती.

मला जेव्हां ही गोष्ट कळून आली, तेव्हां मला अतिशय वाईट वाटलं, माझा मनःस्ताप वाढला. मस्तकांत विजेच्या झटक्यासारखे असह्य झटके बसत आणि विचारांच्या धारी मनाच्या अंतराळांत घिरट्या घालीत.—

"मी कोण ?" एका चांगल्या घरंदाज गृहस्थाचा मुलगा बापानें आपल्या नांवामागें 'घरंदाज' या विशेषणाची कमाई केलेली, तर चिरंजीवानें आपल्या नांवामागें 'उनाड' या विशेषणाची कमाई केलेली.

भरतीच्या वेळीं समुद्राच्या लाटा जशा एक सारख्या खालींवर खालींवर व्हायला लागतात, तद्वत् माझ्या मनःसमुद्रांत विचारांच्या वीचि सारख्या क्षणाक्षणाला उसळत होत्या.

   

खटपटीला यश आलं माझ्या ! मला एका छापखान्यांत मुद्रितें

तपासनिसाचें काम लागलें. महिना पंधरा रुपयांसाठीं मी दररोज दहा तास मुद्रितें तपासण्याचें–डोळे फोडी काम करूं लागलों.–सहा सात महिने मी ही नोकरी केली.

निरनिराळ्या पुस्तकांचीं मुद्रितें तपासून आणि लायब्ररींतील इतरही पुस्तकं वाचून–"आपणही कांहीं तरी लिहावं" अशा तऱ्हेचा जबरदस्त परिणाम माझ्या मनावर झाला आणि लिहिण्यास सुरवात केली. प्रथमतः छोटे छोटे चुटके, लघुनिबंध आणि व्ह. फा. च्या विद्यार्थ्यांच्या अभ्यासाचे निबंध लिहूं लागलों.

हळूहळू माझ्या लेखनाचा अभ्यास वाढला. वर्षानंतर मी जरा बऱ्यापैकीं लिहूं लागलों. लेखनांतले गुणदोष मला कळूं लागले. याचवेळीं मी एक नाटिका लिहीण्यास घेतली. आणि कर्मधर्म संयोगानें अपुऱ्या स्थितींतच एका नवख्या कंपनीच्या पसंतीला उतरली ती. त्या कंपनीनें माझी नाटिका घ्यावी अशी माझी खटपट चालूं होतीच–आणि यशही आलं माझ्या खटपटीला. नाटिका पुरी करून देण्याचं मी वचन दिलं आणि आठ दिवसांत वचन पुरेंही केलं. नाटिका लिहून संपूर्ण तयार केली.

नव्वद रुपये मोबदला ठरला. नाटिकेच्या तालिमी घेण्यासाठीं मी कंपनींत तीन महिने काढले. आणि नाटिकेचा प्रथम प्रयोग साजरा झाल्यानंतर मधुर भाषणाच्या ओझ्यानें आणि 'रिकाम्या खिशानें' परत आलों.

"नवोदित लेखक" या भावनेनीं माझे मित्र माझ्याकडे पाहूं

लागले. ज्यांनीं मला उनाड म्हटलं होतं तेही "कर्तबगार तरुण" या भावनेनीं मला ओळखूं लागले.

माझं शरीर साभिमान रोमांचित झालं ! मूठभर मांस वाढलं माझं ! मी लेखक झालों—कवि झालों. माझा दर्जा वाढला.—आतां मुद्रितें तपासनिसाचें कामही मला हलकें वाटूं लागलें.

वृत्तपत्रांच्या कचेऱ्यांतून मी जाण्यायेण्याचा परिपाठ ठेवला. हळूहळू ओळखी वाढल्या. वृत्तपत्रांतून कधीं कधीं माझे स्फुट लेखही प्रसिद्ध होत असत. आणि त्यावर मला थोडी बहुत कमाईही होत असे. पण ती कमाई अत्यंत अल्प ! मला नोकरी पाहणं जरूर वाटलं !

मी एका वृत्तपत्राच्या मुख्य संपादकांकडे नोकरीचा अर्ज टाकला आणि प्रत्यक्षच त्यांच्या भेटीला गेलों.—

अपुऱ्या शिक्षणाचा जबरदस्त धक्का मला बसला. वृत्तपत्रासाठीं येणाऱ्या इंग्लिश तारांचं भाषांतर मला करता येणं शक्य नव्हतं—इंग्लिश वृत्तपत्रें, मासिकें, साप्ताहिकें वगैरे मला वाचतां येणं अशक्य होतं. (पुढें अभ्यास वाढवला मी! आतां उत्तम तऱ्हेनीं इंग्लिश जाणतों).

"नोकर म्हणून पत्रासाठीं तुमचा कांहीं उपयोग होणार नाहीं. तुम्ही लिहीतां बरं—प्रचलित विषयावरील तुमचे लेख चुरचुरीत असतात, पण इंग्रजीच्या अभावीं तुम्हांला नोकर म्हणून ठेवतां येणार नाहीं." मुख्य संपादक मला म्हणाले.

मी जर मॅट्रिक झालों असतों तर—? मला इंग्लिश येत असतं तर—? तर—?— जर तरच्या गोष्टी हव्यात कशाला? येत नाहीं ही गोष्ट सत्य आहे.

संपादकांचं म्हणणं खरं होतं—पण मला मात्र अतीशय वाईट वाटलं. माझं शिक्षण पुरं झालं असतं तर मी सहसंपादक म्हणून वावरलों असतों असं वाटून मन खिन्न झालं. जिच्यामुळें मला शिक्षण सोडणं भाग पडलं त्या शशिकलेच्या आईचा मला अतीशय राग आला. अनावर रागाच्या भरांत तिचा सूड घ्यावा असं वाटलं.—सूड—घ्यायचा—गोष्ट खरी, पण कोणत्या मार्गानें गेलें असतां सूडपूर्तीचं समाधान लाभेल याचा निर्णय होईना!

खूप विचार केल्यानंतर मला मार्ग सांपडला.

शशिकलेला—तिच्या मुलीला—मोहवून टाकण्याच्या खटपटीला मी लागलों. जिच्यामुळें माझं नुकसान झालं होतं, तिचा छळ तिच्या मुलीकडूनच करवायला लावूं असं वाटलं. कितीही प्रयत्न केला, वाटेल ते डावपेंच टाकून परिश्रम केले तरी तिचं माझं लग्न होणं अशक्यच जाणार याची मला पूर्ण जाणीव होती. तिचे वडील कांहींसे नवमतवादी होते. पण आई या गोष्टीला अडथळा केल्याशिवाय कधींही राहणार नाहीं हें मला पक्कं ठावूक होतं. आणि म्हणूनच तर शशिकलेच्या मनांत माझ्याविषयीं प्रेमभाव उत्पन्न व्हावा अशी हांव मी धरली.

माझ्याविषयीं तिच्या मनांत प्रेमभाव रुजल्यानंतर माझ्याशींच विवाह करण्याची तिची प्रवृत्ती बळावणार, आणि या तिच्या प्रवृत्तीला तिची आई अडथळा करणार हें नक्की. तेव्हां अशावेळीं तिच्या आईचं मन:स्वास्थ्य टिकून राहील—चांगलं राहील—हें शक्यच नाहीं.

त्यावेळीं तिच्या मनांत जें द्वंद्व माजेल—तिच्या मनाची जी ओढाताण होईल—ती पाहूनच मला सूडपूर्तीचा आनंद वाटेल निःसंशय, असं मला वाटलं अन् मी उद्योगाला आरंभ केला.

आतां आपण कसं वागायला हवं याबद्दलचा मी विचार केला, मनाशीं कांहीं आखाडे तयार केले, आणि माझ्या योजनेप्रमाणें मी वर्तणुकींत आस्ते आस्ते फेरबदल केला. ज्यायोगानें तिचं मन आकर्षिण्यास सुलभ जाईल अशीच वर्तणूक ठेवण्याची मी शिकस्त करूं लागलों.

आणि त्याचा इष्ट तोच परिणाम झाला. माझ्या या इच्छेची पूर्तता झाली. ज्या एका मुख्य हेतूच्या सफलतेसाठीं मी जीं कांहीं उपांगं निर्माण केलीं होतीं त्यांपैकीं एक यशस्वी झालं. शशिकलेचं मन माझ्याकडे ओढलं गेलं निःसंशय!

शशिकलेचं मन माझ्याकडे ओढलं गेलं हें खरं असलं तरी पुढें मला त्याबाबत पश्चात्ताप झाला. मी केलं तें अयोग्य केलं अशी माझी खात्री झाली. मी हें कृत्य करायला नको होतं.

शिकार करायला गेलों हें खरं, पण शिकार झालों. मारायला गेलों, पण स्वतः मेलों.

# प्रकरण २ रें–शशिकला



## शशिकलेनें लिहीलेली हकीकत

मी रुपानें फार चांगल्यापैकीं आहें अशांतला कांहीं भाग नाहीं, साधारणच, पण जरा ठाकठीक वागण्यानें अन् व्यवस्थित वेशभूषा केल्यानें माझ्या अंगीं थोडीशी तरी आकर्षकशक्ति निर्माण होई हें खास! मला घरकामाचा अत्ती कंटाळा. त्यापेक्षां लघुकथा, कादंबऱ्या वाचाव्यात, वाङ्मय विषयावर वादविवाद करावेत, लेखक वर्गाच्या सहवासांत असावं हेंच मला विशेष आवडे. आईला माझं हें वागणं खपत नसे, पण दादांना आवडे म्हणून ती यावर ज्यास्त कांहीं बोलत नसे. ती म्हणे "अग बायकांनीं हें असं वागणं बरं नव्हे." तर तिच्या तोंडाला कुलूप घालण्यासाठीं दादा म्हणत–"अग हें नवयुग आहे. यांत स्त्रियांना पूर्ण स्वातंत्र्य दिलंच पाहिजे. स्त्री हीच जगाची खरी उद्धारकर्ती आहे हें तत्त्व आतां सर्व सम्मत झालं आहे. वागूं दे तिला हवी तशी. माझा पूर्ण विश्वास आहे तिच्या वर्तणुकीवर! कांहीं बिघडणार नाहीं."

दादांच्या या उद्गारानें मला दुप्पट स्फुरण चढे नी आईकडे जरा कुऱ्यानेंच पहात असें मी! दादांचा माझ्यावर पूर्ण विश्वास, पण आईचं तसं नव्हे, ती मनांतून नेहमीं साशंकच असे. आईची ती प्रत्येक वेळची कुचंबणा नी त्यावर ते दादांचे उत्तेजित उद्गार ऐकून

हळूहळू माझ्या मनावर "शक्य तितका जास्त वेळ पुरषांशीं गप्पा मारण्यांतच घालवावा" असा परिणाम होऊं लागला.

थोड्याशा लांबच्या नात्यांतले, पण आमच्या नी त्यांच्या घराचा संबंध येत असलेल्या घरांतले चंद्रकांत नांवाचे तरुण होते. त्यांची वृत्ती अभ्यासू होती. शाळेबाहेर राहूनच त्यांनीं इंग्लिश भाषेचं ज्ञान कमावलं होतं. आतां ते हॅवेलॉक एलिस किंवा हर्बर्ट स्पेन्सर सारख्यांचे ग्रंथही जाणूं शकतात. त्यांना मानसशास्त्राची तर अत्ती आवड होती. ते त्या विषयाचा अभ्यासच करूं लागले होते अलीकडे. मानसशास्त्र हा एक रुक्ष विषय म्हणून मी कधीं त्याकडे लक्ष दिलं नव्हतं, पण कां कोण जाणे, हळूहळू मी त्याकडे लक्ष देऊं लागले. मानसशास्त्रावर चंद्रकांतांशीं चर्चा करतांना मला आतां हुरूप येऊं लागला. परवांचीच गोष्ट—मी नी चंद्रकांत सायंकाळीं फिरायला गेलों होतों. रस्त्यांत आमची त्यावरच चर्चा चालू होती. माझ्याप्रमाणेंच मानसशास्त्रावर माझ्याशीं चर्चा करण्यांत त्यांना हुरूप येत असावा असं त्यांच्या आवेशावरून मी जाणलं. चर्चा करतांना "Reflex Actions"–(प्रतिकार क्रिया) च्या मुळाशीं "Unconscious Process"–(असावधानतेची रहाटी) आहे ही गोष्ट सिद्ध आहे वा नाहीं यावरच आमचें बोलणें वाढूं लागलें.

'Reflex Actions च्या मुळाशीं निव्वळ शारिरिक क्रिया नाहींत हें खरें, त्यांत क्रिया प्रक्रिया आहेतच, पण म्हणून त्यांत शारिरिक क्रिया नाहींतच असेंही म्हणतां येणार नाहीं' हें मेरिनानें

कसें सप्रयोग सिद्ध करून दाखविलें आहे याचा उल्लेख करून बोलतां बोलतां " Educational Psychology " या पुस्तकांतील त्यावेळीं आठवलेले कांहीं उतारेही त्यांनीं निवेदिले.—त्यानंतर आमची चर्चा वाढतां वाढतां ती " Determinism " (नियतिवाद) या विषयावर घसरली. आणि आपल्या मानसिक जीवनांत कोणतीही एकादी गोष्ट अकस्मात् होते वा नाहीं यावरच आम्ही बोलूं लागलों. अधिभौतिक शास्त्रांत कार्यकारण परंपरेचा नियम जसा सर्वत्र लागू पडतो, तद्वत तो मानसिक क्षेत्रांतही लागू पडतो कां ? मनांतील कोणताही व्यापार सहज उद्भवला असं म्हणतां येतं वा नाहीं ? मानसिक जीवनांत बाह्य परिस्थितीचें अंग प्रामुख्यानें मानावें कीं नाहीं—वगैरे वगैरेवर आमचा बराचसा वादविवाद झाला.

   

आज 'भावबंधन' हें नाटक गांवांतच स्थापन झालेल्या एका नवख्या कंपनीनें लावलें होतें. गडकऱ्यांचीं सारींच नाटकें मी यापूर्वीच अगदीं लक्षपूर्वक वाचून काढलीं होतीं. पण आज केवळ चंद्रकांतांना तें पाहाण्याची लहर लागली म्हणूनच मलाही जावेंसें वाटलें.

पहिला अंक संपला अन् मी आजूबाजूच्या खुर्च्यांकडे लक्ष दिलं. पलीकडील खुर्चीवर माझी चारू नांवाची मैत्रिण बसली होती. तिनें माझ्याकडे पाहिलें. अम्हां दोघींची दृष्टादृष्ट झाली. चारू मजजवळ आली नी म्हणाली—"कोण कोण आलां आहांत ग ?"—त्यावर मी चंद्रकांतांकडे दृष्टी वळवून "आम्ही दोघेंच आलों आहोंत" असें

तिला सांगितलें. त्यावर मिस्कीलपणें हंसत ती म्हणते "अस्सं का? असेंच दोघांनीं मिळून जगाचा खेळ पाहायचा ठरविला आहांत ना? कांहीं हरकत नाहीं. Congratulations."

तिच्या बोलण्याचा सारांश मी जाणला. मला अत्ती राग आला तिचा. पण करतें काय; मुकाट्यानें बसलें. थोड्या वेळानें नाटकाला सुरवात झाली. नाटक हळूहळू रंगत चाललं हें थिएटरांत पसरलेल्या शांत वातावरणावरून चटकन् कळून येण्यासारखं होतं. पण माझं लक्ष मात्र त्याकडे बिलकूल लागेना. माझ्या मस्तकांत तें चारूचें वाक्य घोळूं लागलें. मला अगदीं चैन पडेना. शेवटीं मी मधेंच उठलें नी चंद्रकांतांना म्हणालें—"माझं डोकं दुखतं आहे. मला अगदीं बसवेना. जाऊं का मी?" त्यावर तेही उठले नी माझ्या-बरोबर बाहेर आले. नाटक अर्धेच पाहून परत जावें लागत आहे त्याबद्दल त्यांना फार वाईट वाटलं. आणि केवळ माझ्याचसाठीं ते परत निघाले आहेत असें त्यांच्या बोलण्यावरून मी जाणलेंही! एकंदरींत आम्हां दोघांच्या वर्तणुकींतच कांहींतरी "गम्य" आहे असा लोकांच्या मनाचा ग्रह होतो असें वाटून माझें मन उद्विग्न झालें, जीव त्रस्त झाला, मेंदूला थकवा आला. विचार! विचार! विचारांचं नुसतं थैमान माजलं मस्तकांत!

त्यांतच आणखी एका गोष्टीची भर पडली.

परत येतांना रस्त्यांत मी चंद्रकांतांना खरी स्थिती निवेदिली. तेव्हां ते हंसून म्हणाले—"काय या लोकांना वाटतं कोण जाणे!

स्त्रीपुरुषांच्या मैत्रींत लैंगिक आकर्षणच असतं, त्यांत कधीं शुद्ध सात्विक भाव नसतोच असेंच यांना वाटतें कीं काय? पण ही किती भ्रामक नी घातक समजूत आहे. एकाद्या वेळीं अशानें भलताच गैरसमज उद्भवायचा! छे बुवा! हें कांहीं बरें नव्हे. निदान मी तरी लैंगिक आकर्षणानें बांधला जाणार नाहीं.

त्यांचें हें म्हणणें झोंबलें मला! कांहींतरी एका निराळ्याच प्रकारचा धक्का बसला मनाला. आईदादांच्या परस्परविरुद्ध वर्तणुकीनें नी लोकांच्या त्या तशा ओरडण्यानें चंद्रकांतांवर माझें प्रेम बसतें आहे याबद्दल हळूहळू माझ्या मनाची खात्री होऊं लागली, त्यांच्या-विषयींचे माझे मनोभाव विकास पावूं लागले, पण चंद्रकांताच्या त्या आतांच्या म्हणण्यानें मात्र मी पुन्हां विचार करूं लागलें—'मला वाटतं आहे हें खरें आहे कां? तशीच खरोखर परिस्थिति असूं शकेल काय? चंद्रकांतांविषयीं माझा तर्क चुकत तर नाहीं ना?' अशा तऱ्हेचे माझ्या मस्तकांत विचार थैमान घालूं लागले, नी जीव त्रस्त झाला.

शेवटीं माझी मनोभूमिका त्यांना नीटशी समजली नसावी म्हणून त्यांनीं कदाचित् असे उद्गार काढले असतील असा तर्क करून मी माझ्या मनाचें समाधान करून घेतलें.

   

मी प्रो० जेम्सचें "Text Psychology" हें पुस्तक वाचीत होतें. वाचतां वाचतां Affective Process या मुद्यावर माझी

नजर खिळली. मी तो मजकूर लक्षपूर्वक वाचूं लागले. इतक्यांत छोटी बहीण लिली धांवतच माझ्याकडे आली नी तें पुस्तक हिसकावून घेऊन मला म्हणूं लागली. "पुले कल ना ग ताई, सदान्कदा तूं आपली पुत्तकच वाचीत असतेस." तिच्या या बोबड्या बोलाचं मला कौतुक वाटलं. मी तिला तशीच अलगद उचलून घेतली नी तिचे चार पांच पटापट मुके घेऊन तिला म्हणाले "मग काय करूं?" त्यावर "अंऽऽ किनई खेळायला चल आमच्याबलोबल. आम्ही किनई आतकुल भातकुल खेळनाल आहोंत." मी पुन्हा चार पांच मुके घेतले; नी "बरं येईन हं." असें म्हणून तिला खालीं सोडलें. खोलींतून जातां जातां "येछील ना? येछील ना?" असें तिनें मला दोनतीनदां बजावलें. त्यावर मी "हो, हो" म्हणाले तरी शेवटीं लिली म्हणालीच "नाहींतल जाछील चंद्लकांतांकलं! हो मला माहीत आहे, तुला तेच जात्त आवलतात माझ्यापेक्षां."

बिचारी छोटी लिली! तिला कळणार तरी काय? लोकांच्या दृष्टीला दिसणारे 'चाळे' तिच्या ध्यानींमनींही नसतील; पण तिनं म्हटलेलं तें वाक्य—तें वाक्य ऐकून माझ्या विचाराला दिशा मिळाली. लोकांची एक विकृत दृष्टी असेल आम्हांकडे पाहाण्यांत असेंच मला आजपर्यंत वाटत होतें, परंतु लोकांच्या दृष्टींतले हे भाव लिलीच्यासुद्धां अंतःकरणापर्यंत पोहोचलें, माझ्या नी चंद्रकांतांच्या अंतःकरणांतील भावना लिलीच्या कोमल नी अज्ञ मनाला जाणवली, तेव्हां आमच्या

वागण्यांतच तसा कांहींतरी 'फेरबदल' झाला असला पाहिजे हें खास असें वाटून मन त्रस्त व उद्विग्न झालें.

वेळोंवेळीं माझ्याबद्दल चंद्रकांतांनीं दाखविलेल्या ममत्वामुळें, आईच्या कुचंबणामुळें, दादांनीं दिलेल्या फाजील स्वातंत्र्यामुळें, मैत्रीणींनीं जाणून बुजून मारलेल्या टोमण्यांमुळें, आम्हांकडे पाहण्यांत लोकांची जी एक विकृत दृष्टी—तीमुळें माझ्या मनावर इतका कांहीं जबर परिणाम झाला, कीं केव्हांतरी एकदां चंद्रकांतांकडे जावं नी त्यांच्याजवळ आपलं प्रेम व्यक्त करावं असं मला वाटूं लागलं! 'स्त्रीसुलभ लज्जा' म्हणतात तें माझ्याबाबतींत लोप पावेल असें मला वाटूं लागलें.

   

मनाशीं निश्चय केला नी चंद्रकांतांना एक पत्र लिहीलं. पत्र लिहून झाल्यावर तें त्यांच्या टेबलावर ठेवून दिलं. मला चंद्रकांतां-विषयीं जें कांहीं वाटतं आहे तें अगदीं स्पष्टपणें मी त्यांत लिहीलं होतं. त्या पत्राला त्यांच्याकडून काय उत्तर येतं हें पाहून मी पुढील वागण्याची आंखणी करणार होतें.

दोन दिवस होऊन गेले तरी त्यांच्याकडून उत्तर येईना. अंतःकरणांत कालवाकालव होऊं लागली, जीव गुदमरला, वाटलं उगाच त्यांना पत्र लिहीलं. हृदयाला हेलकावे बसूं लागले. विचारांची खळबळ माजली अंतःकरणांत. या दोन दिवसांत अगदीं नेहमींप्रमाणेंच वर्तणूक होती त्यांची. माझं पत्र पोंचलं आहे, तें त्यांनीं वाचलं आहे

याची जाणीवही त्यांनीं मला दिली नाहीं. त्यांच्या या वर्तणुकीमुळेंच मला कोंडल्यासारखं होऊं लागलं. पाण्यानें गच्च भरलेल्या एकाद्या भांड्याला हलविलं म्हणजे थोडंसं पाणी बाहेर उफराडून येतं नी कांहीं वेळ हेलावूं लागतं. अगदीं तश्शी स्थिति झाली माझी! मी स्वतः हें प्रेमानें गच्च भरलेलें भांडें त्यांच्या दृष्टीसमोर हलविलं. आतां त्यांत उठणारे भावतरंग बाहेर उफराडून येण्यासाठीं अतोनात धडपड करूं लागले.

रबर ताणून ताणून—असं ताणलं जाईल तरी किती?—अखेर तें तुटणारच. दोनचार दिवस होऊन गेले तरी ते अगदींच बोलेनात तेव्हां मात्र मी मनाशीं निश्चय केला नी प्रत्यक्षच त्यांना भेटायला गेलें.

# प्रकरण ३ रें—भावविकास

## चंद्रकांतानें लिहिलेली हकीकत

मी माझ्या खोलींत Earnest Jones नें लिहीलेलं Psychology चं पुस्तक वाचीत होतों.—ती वेळ दुपारची—म्हणजे असतील साधारण चार साडेचार वाजलेले. Psychology हा विषय म्हणजे माझा अत्यंत आवडता विषय. मी वाचनांत अगदीं तल्लीन झालों होतों; इतक्यांत खोलींचं दार वाजलं. माझी तन्द्री उतरली. मी दरवाजाकडे पाहिलं—

शशिकला भेदरल्या नजरेनीं आंत येत होती. तिचा ऊर धडधडत होता, अन् सर्वांग घामानं डबडबलं होतं. शशिकला आंत आली, एका हातानं तिनं दरवाजा पुढं केला आणि तिथंच दरवाजाला टेंकून उभी राहिली ती.

अशा या विचित्र वेळीं तिनं माझ्याकडे कां यावं, असा मी साश्चर्य विचार माझ्या मनाशीं करूं लागलों. शशी तेथेंच खालीं मान घालून उभी होती. 'आपण कां आलों आहोंत,' हें कोणत्या शब्दानं निवेदावं असा विचार ती करीत असावी.—क्षण-अर्धा क्षणपर्यंत खोलींत अगदीं विलक्षण शान्तता पसरली होती. आम्हां दोघांच्या श्वासोच्छ्वासाचा जो कांहीं अत्यंत सूक्ष्म आवाज निर्माण होई तेवढाच! पण ही शांतता थोड्याच वेळांत नष्ट झाली. मी तिच्याकडे पाहिलं.

तीच वेळ—तिनंही माझ्याकडे पाहिलं. माझ्या नजरेंत आश्चर्यता भरली होती.—तिच्या नजरेंत भीतिमिश्र आर्तता भरली असावी असा माझा तर्क होता. जें कांहीं सांगायचं होतं तें—म्हणजे मनोभाव—अगदीं मोजक्याच शब्दांत अडखळत अडखळत तिनें मला सांगितलें! घरून निघते वेळीं तिनें आपल्या मनाचा हिय्या केला असावा; पण इथं माझ्यासमोर बोलतांना ती घाबरली—अडखळली. तिनं पुन्हां जमिनीला न्याहाळून पाहण्यास सुरवात केली. तिचें सर्वांग थर थर कांपूं लागलें! तिला धड उभेंही राहवेना. जवळच असलेल्या झुलत्या आराम खुर्चीचा आधार घेतला तिनें.

"लाट किनाऱ्याकडे येईल; किनारा लाटेकडे जाणार नाहीं." हें वाक्य कुणीतरी प्रथित यश लेखकानें आपल्या पुस्तकांत लिहिलें आहे. मला आठवलें तें यावेळीं.—आणि सत्यता पटली मला त्याची.—तिचे शब्द ऐकून मी गोंधळलों. हा प्रसंग केव्हां तरी उद्भवणार हें मी जाणून होतों.—तो उद्भवावा अशीच माझी इच्छा होती. कारण सूडाची तगमग!—मात्र इतक्या लवकर हा प्रसंग उद्भवेल ही कल्पना नव्हती मला.

मी माझ्या मनाशीं विचार करूं लागलों—अपल्याला सूड घ्यावयाचा आहे, तो हिचा नव्हे!—तर—? तर तिच्या आईचा सूड घ्यायचा होता. माझ्या शिक्षणावर जिनं पाणी पाडलं,—जिच्या योगानें मला शिक्षण सोडणं भाग पडलं—त्या तिच्या विघ्नसंतोषी अन् खाष्ट आईचा सूड मला घ्यावयाचा होता—तेव्हां हिला मोहविण्यांत

आपल्या सूड पूर्तेची भावना शमणें शक्य नाहीं.—आणि मला तें इष्टही वाटेना.—शिवाय मी माझ्या मनाशीं असाही विचार केला कीं, मी जर या माझ्या आतांच्या वयांत अशा फंदांत पडलों तर—तर माझ्या आयुष्याचा नाश होईल.——या फंदांत पडण्यासारखं माझं वय अद्याप पूर्णतेला पोहोंचलं नव्हतं. वयाच्या पंचविसाव्या वर्षीचे हे ढंग असतात—वीसाव्या वर्षीचे नसतात--पण नसले तरी याच वयांत ते जाणवूं लागतात हें निःसंशय! मीच काय—पण वीस-बावीस वर्षांच्या कोणत्याही तरुणानें जर प्रांजलपणें सांगितलें तर—थोड्याबहुत अंशानें कां होईना--अत्यंत सूक्ष्मावस्थेंत--सुप्तावस्थेंत—कां होईना—पण ही भावना दडलेली होती असंच तो प्रांजलपणें कबूल करणं शक्य आहे.——अस्तू.

वस्तुस्थिती अशी कीं,—माझ्या मनांत तिच्याविषयीं "ती भावना" प्रथमतः रुजली. त्यानंतर तिच्या मनांत "ती भावना" मी रुजवली. पण इतकं असूनही आतां तिच्या म्हणण्याला मला रुकार देववेना! माझं मन कच खावूं लागलं. मी माझ्या स्वार्थासाठीं तिच्या म्हणण्याला रुकार दिला नाहीं. शेवटीं मी तिच्याशीं प्रतारणा केली. मी तिला म्हणालों—"चुकते आहेस शशी तूं. तूं ज्या भावनेनीं माझ्याकडे पाहात आलीस, ती भावना अद्याप देखील माझ्या अंतःकरणांत नाहीं. तूं मनमोकळ्या स्वभा-वाची—मी मानसशास्त्राचा भोक्ता, तुलाही त्याची गोडी म्हणूनच मी इतक्या खुल्या दिलानें तुझ्याशीं वागलों. आणि लैंगिक आकर्ष-

णाच्या विरुद्ध आहे मी, असं मला वाटतं—मी यापूर्वींच तुला सांगितलं असावं.—"

माझा नकार ऐकून तिच्या मनाची काय स्थिती होईल याचा मी विचारच केला नाहीं. वास्तविक तिच्या म्हणण्याला मी रुकार द्यायला हवा होता—नव्हे—तिनं जें मला विचारलें होतं तें प्रथम मीच तिला विचारायला पाहिजे होतं—पण.

एकंदर परिस्थिती; माझं वय—माझ्या घरांतील माणसांची सनातनी मनोवृत्ती—आणि ज्या भावनेच्या पूर्ततेसाठीं मी उच्छृंखल झालों होतों—त्या भावनेच्या अपूर्ततेची जाणीव—इतक्या गोष्टी मनश्चक्षूंपुढें नाचूं लागल्या—म्हणून मी माझ्या अंत:करणांत रुजलेल्या तिच्या विषयींच्या ज्या कांहीं भावना होत्या त्यांचें उच्छेदन करायचा निश्चय करून मी तिची सपशेल प्रतारणा केली.—तिच्याशीं खोटं बोललों—दांभिकपणाचा आव आणला.—आणि वर लैंगिक आकर्षणाच्या विरुद्ध आहें असं शेखी मारून सांगितलं.

तिच्या गालांवर दोन अश्रूबिंदू ढिबकलेले मला दिसले; जडपावलानें नी शून्य मनानें तिनं आपल्या घरचा मार्ग धरला.

## शशिकलेनें लिहीलेली हकीकत.

केवढ्या आशेनं मी चंद्रकांतांच्या घरीं गेलें होतें. लाजलज्जा सोडून अंत:करण खुलं केलं त्यांच्यासमोर—आणि त्याचा काय हा विपरीत परिणाम झाला.—काय उत्तर मिळालं मला.—थप्पड खाऊन

परत आलें मी. केवढा गैरसमज झाला माझा?—त्यांच्या सरळ वागण्यांत मला प्रेमाच्या आकर्षणाचा भाग दिसला तरी कुठं?—

किती तरी विचार माझ्या मस्तकांत घोळत होते. मस्तक सुन्न झालं! डोळयांतून अश्रू गळूं लागले—मुकाट्यानें दार उघडलं नी आल्या पावलीं परतलें.

हिरे मूळचेच प्रदिप्त असतात. पण त्यांना पैलू पाडल्यानंतर अन् कोंदण बसविल्यानंतर ते जास्त तेजस्वी दिसतात. मनोभावही मूळचेच प्रदिप्त असतात—पण लोकांच्या ओरडण्यानें नी आजुबाजुच्या परिस्थितीनें ते जास्त प्रखर होतात.—त्यांची जाणीव होऊं लागते मनाला.

मानसशास्त्रांत ज्याला 'अनुब्दुद्धावस्था' म्हणतात तीच 'प्रबुद्धावस्थेचं एक निराळं स्वरूप आहे. ही अनुब्दुद्धावस्था जोंपर्यंत अव्यक्त स्वरूपांत आहे तोंपर्यंत तिची जाणीव मनाला होत नाहीं. पण त्याच्या मुळाशीं ज्या दबलेल्या इच्छा असतात त्या वाढल्या, पूर्णतेला पोहोंचल्या म्हणजे तीच 'अनुब्दुद्धावस्था' 'प्रबुद्धावस्थेच्या' स्वरूपांत प्रकट होते.

माझ्या अंतःकरणांत चंद्रकांतांविषयीं कांहीं तरी एक भावना होती—नाहीं तरी कां म्हणूं मी?—पण ती अव्यक्त स्वरूपांत होती—अनुबुद्धावस्थेंत होती. नंतर बाह्य परिस्थितींत जसजसा फेरबदल होत गेला—तसतसं या अवस्थेची जाणीव माझ्या मनाला होऊं लागली. अव्यक्त स्वरूपांत असलेली इच्छा व्यक्त स्वरूपांत प्रकट झाली. अनुबुद्धावस्थेचें रूपांतर प्रबुद्धावस्थेंत झालं. आणि या अतृप्त इच्छा तृप्त व्हाव्यात अशी तळमळ लागली मनाला.

अनुब्दुद्धावस्थेंत अतृप्त इच्छा दडलेल्या असतात आणि त्या तृप्तीसाठीं हापापलेल्या असतात. त्या अतृप्तेच्छांची वाढ झाली; त्या परिणत स्वरूपाला पोहोंचल्या म्हणजे प्रबुद्धावस्थेंत येऊन कार्य करूं लागतात–आणि अशा रीतीनें क्रियेच्या रूपानें त्या प्रकट होतात.

माझीही तशीच अवस्था झाली.

बाह्य परिस्थितीमुळेंच माझे मनोभाव व्यक्त स्वरूपांत विकासले.

# प्रकरण ४ थें—सात जानेवारी

## चंद्रकांतानें लिहीलेली हकीकत

Psychology चं कोणतंही पुस्तक वाचल्याशिवाय सहसा हातावेगळं करीत नसें मी ! ट्रॅन्स्लेनें लिहीलेलं New Psychology हें पुस्तक अर्धवटच वाचून झालं होतं माझं—पण आतां त्यापुढें वाचायला माझं लक्ष लागेना. या दोन तीन दिवसांत माझी बेचैन वाढली, मला कांहीं सुचेना, कशांतच माझं मन रमेना. मला माझ्या मनाची स्थिती अगदीं स्पष्ट स्वरूपांत आणि स्पष्ट शब्दांत शशिकलेजवळ व्यक्त करायची होती; पण तसं माझ्याकडून झालं नाहीं.—मी तिच्याशीं प्रतारणा केली.—खरं बोलावं असं मला वाटेना त्यावेळीं—तसंच खोटं बोलत आहोंत याबद्दल मनाला बोंचणीही पण लागली होती त्यावेळीं तरी पण खऱ्याखोट्याच्या शक्याशक्यतेचा विचार करण्याची ती वेळ नव्हती.—आणि खरं बोलणं शक्य झालं नाहीं मला.

आणि तें शक्य झालं नाहीं म्हणूनच आतां माझ्या अंतःकरणांत तगमग होऊं लागली. माझ्या साऱ्या वृत्तींवृत्तींमध्यें तीव्र कलह माजल्याचा अनुभव येऊं लागला मला.

मनुष्याला दोन मनं असतात म्हणे ! शास्त्रज्ञांनीं या दोन मनांना एक 'अज्ञात मन' आणि दुसरं 'ज्ञात मन' अशी संज्ञा दिली आहे. अज्ञात मनांत नेहमीं अतृप्त इच्छा दडलेल्या असतात म्हणे !

अनेकांपैकींच माझ्या अज्ञात मनांत माझी ही एक '**इच्छा**' दडलेली होती. पुढें जसा शशिकलेचा नी माझा सहवास वाढला तसतसें ह्या "अतृप्त इच्छेचं" स्वरूप परिणत झालं; आणि "ती इच्छा" तृप्त व्हावी अशी हाव लागली माझ्या मनाला.

पुढें—मी करतों हें बरोबर आहे कां ? यापासून माझ्या आयुष्याला कांहीं धोका तर पोहोंचणार नाहीं ना ? अशा विचारांचं वादळ माझ्या मस्तकांत उठूं लागलं. माझ्या मनांत द्वंद्व माजलं.

ज्या ज्या वेळीं 'हें करूं कां तें करूं ?' अशा तऱ्हेचं द्वंद्व—मनुष्याच्या मनांत सुरू होत असतं—त्या वेळीं कलह लागलेल्या दोन वृत्तींपैकीं एक वृत्ती दडपली जाते.

विचार करून करून प्रेमापेक्षां माझ्या स्वतःच्या आयुष्याची किंमत मला जास्त वाटूं लागली. आणि हळूहळू त्याचा परिणाम प्रेमप्रवृत्ति दडपून ठेवण्याकडे होऊं लागला;—नव्हे झाला.

ज्या भावनेची जोपासना माझ्या मनांत सहेतुकपणें—पण आपोआपच झाली होती त्या भावनेचा चुराडा करायचं मी ठरविलं—तरी पण माझ्या मनाला तीव्र यातना होऊं लागल्या. मी माझी "ही मनोवृत्ती" दडपून ठेवण्याचा प्रयत्न करूं लागलों—पण तसं करतांना मला दुःसह यातना सहन कराव्या लागत.—पण—किती झालं तरी—सहन शक्तीला मर्यादा असते. एक प्रसंग असा निर्माण झाला कीं, माझ्या सहनशक्तीच्या मर्यादा संपल्या.

मला वाटतं—जानेवारीची ती सात तारीख असावी. सायंकाळची

सहा–साडेसहा वाजण्याची वेळ होती. मी माझ्या खोलींत खिडकी-जवळ रस्त्यावरील हालचाल पाहात बसलों होतों.

जवळ जवळ एक महिना झाला--माझी अन् शशिकलेची भेट झाली नव्हती.—मी मुद्दामच टाळाटाळ केली होती.

मी निश्चल नजरेनीं रस्त्यावरील हालचाल पहात होतों. पण मन शशिकलेभोंवतीं घोंटाळत होतं. माझ्या मनश्चक्षूंपुढें शशिची मूर्ति अगदीं स्पष्ट उभी राहिली. यावेळीं मी अगदीं पूर्ण एकाग्र होतों. माझा आवेग वाढला; माझ्या गात्रांत कांहींतरी एक निराळीच अननुभूत चेतना निर्माण झाली असावी असा भास झाला मला त्यावेळीं. माझ्या अंगीं एक प्रकारचा उन्माद संचरला होता. माझ्या तोंडून मला नकळतपणें—'शशिकला, शशिकला' असे उद्गार निघूं लागले.

अखेरीस मला कांहींतरी वाटलं ! अंत:करणांत 'कसल्या' तरी भावनेचा शिरकाव झाला.—मी एकदम उठलों; कपाळावरचे केंस मागें सारले. कपडे घातले अन् घाईघाईनें खोली बाहेर पडलों तों थेट शशिकलेच्या घरीं गेलों.—

शशिकला आपल्या खोलींत पेटी वाजवीत एक गोड भावगीत म्हणत होती. तिचा आवाज मधुर–सुरेल होता. गोड गळ्यांतून निघालेले ते सूर मोहक वाटले मला.

कवि चंद्रशेखरांचं भावगीत होतं तें !—

**"खेदभरानें रात्रन्दिन हें तनु माझें कापतें,—**

**अन्तर प्रेमानें व्यापतें,**

येशिल नाथा ! पुन्हा कधीं ह्या खन्तीनें सारखी ?
अनाथा तळमळते ही सखी;
किती निसासे त्यजितें, झिजतें, मी बरळे, विव्हळे,
वियोगें अशी तुझ्या आहळे;
पाडुनि या हृदयाला घरे,
करुनी शान्तीचें खोबरें,
छळिती किति विपदा–सङ्घ रे !
कुणी कुणाच्या प्रेमावर कधिं असा बिबा फांसला
असे कां ? सांग सख्या तूं मला."

मी दरवाजांतच एकाद्या पुतळ्याप्रमाणें निश्चल उभा होतों. तिचा मधुर आवाज आणि ते करुण सूर माझ्या अंत:करणाला भिडत होते.—अगदीं नि:संकोचतेनें आणि मोकळ्या आवाजानें ती म्हणत होती. मी दरवाजांत उभा आहे हें तिला बिलकूल कळलं नसावं.–ती आपल्याच गुंगींत होती. त्या भावगीतानें जसा माझ्या अंत:करणाचा ठाव घेतला–तद्वत् तिच्याही अंत:करणाचा ठाव घेतला असावा–कारण अगदीं नकळतपणें तिच्या नेत्रांतून अश्रू वाहिलेले स्पष्ट दिसले मला—तरी पण ती तशीच म्हणत होती. तिच्या नेत्रांतून वाहणारे ते अश्रू—अश्रू नव्हेतच; तर लचके काढलेल्या माझ्या अंत:करणाचा रक्तस्रावच होता तो ! इतक्या मला भयंकर वेदना होत होत्या.

माझ्या मनावर भावनेचा पूर्ण पगडा बसला. मी झटकन् पुढें झालों–नी पालथी मांडी घालून बसलेल्या शशिकलेजवळ गेलों.

मी जवळ येऊन उभा राहिलों आहें हें शशिकलेला कळलं. तिनं पेटी बंद केली–अन् उठून उभी राहिली ती!—तिनं माझ्या चेहऱ्याकडे निरखून पाहिलं; —तिच्या अंगावर रोमांच उभे राहिले.— तिचं तोंड, लालबुंद झालं;—किंचित् मागें सरली ती माझ्यापासून.

पण मी ?—माझ्या मनावर एक प्रकारच्या मोहिनीचं दडपण पडलं होतं.–मी अत्यंत आवेशानें तिला आपल्याजवळ ओढलं— आणि—आणि—घट्ट मिठी मारली मी तिला.

तिचं सर्वांग थरथर कांपू लागलं होतं. तिला निराळंच असं कांहीं तरी वाटूं लागलं असावं.

एकच; एकच—तिच्या थरथरणाऱ्या ओठांचं एकच—पण अत्यंत अधाशीपणानें मी तिचं चुम्बन घेतलं! तत्क्षणीं मनावरचा एक मोठा थोरला भार कमी झाल्यासारखं वाटलं मला.—

अनुब्दुद्धावस्थेंतल्या अतृप्त इच्छा वाढल्या म्हणजे त्या प्रबुद्धावस्थेंत येऊन कार्य करूं लागतात याची सत्यता पटली मला.—

मी आणखी एक चुम्बन घेतलं तिचं!—पण तत्क्षणीं मी तिला दूर लोटलं—विस्तवाचा चटका बसल्यानंतर जितक्या जलद अंग झटकतों–तितक्या जलद नी त्याच आवेशानें मी अंग झटकलं.—

माझं मलाच वाईट वाटूं लागलं.—

माणसांचा आपल्या मनोविकारांवर ताबा राहता तर किती छान झालं असतं.—पण छे!—ख्रिस्त म्हणतो तेंच खरं.—

"The spirit indeed is willing; but the flesh is week."

सात जानेवारी भोंवली मला.—

# प्रकरण ५ वें–मनोविश्लेषण



त्यावेळीं माझे केंस अगदीं ताठ उभे राहिले होते ! मी एकाद्या भ्रमिष्टाप्रमाणें हातवारे करीत चालत होतों–रस्त्यावरील कोणत्याच दृश्यांकडे माझं लक्ष नव्हतं.—फक्त माझ्या दृष्टीसमोर तो–तो–कीं, ज्यावेळीं भावातिरेकानें माझ्या हातून तें कृत्य घडलं गेलं–त्यावेळचा प्रसंग–सारखा थैमान घालीत होता. मी केलं तें बरोबर केलं नाहीं असं आतां मला वाटूं लागलं. मी चुकलों आहें याबद्दल माझ्या मनाची खात्री झाली.—मला पश्चात्ताप झाला. मनाला रुखरुख लागली.

आमच्या परिचयाचं रूपान्तर हें अशा भावनेंत होत आहे हें जेव्हां मला कळलं होतं त्यावेळींच आपली ही "इच्छा" पुरी होणार नाहीं हेंही कळलं होतं मला—पण मानवीप्राण्याचा स्वभावच असा आहे कीं,–असाध्य असलेल्या गोष्टी साध्य करून घेण्याकडे त्याच्या मनाची धांव जाऊं लागते.—आणि या नाहीं त्या अशा अन्य मार्गानें तो ती गोष्ट साध्य करण्यासाठीं धडपडतो.

माझीही तशीच स्थिति होती.—मी तिच्याकडे जाऊं येऊं लागलों –तिच्या सहवासांत कांहीं काल तरी आपण असावं ही इच्छा माझ्या जाण्यायेण्याच्या क्रियेच्या मुळाशीं दडलेली होती.—आतांपर्यंत "अनुब्दुद्धावस्था" म्हणजे काय, तिचें स्वरूप कोणतें,–तिचें

अस्तित्व मानावें कीं नाहीं—याबद्दल मी साशंकच होतों. पण प्रत्यक्षच स्वत:च्या उदाहरणानें अनुब्दुद्धावस्थेचं अस्तित्व मला पटूं लागलें. तिच्याकडे वरचेवर जाण्यासाठीं जीं जीं कांहीं मी निमित्तं केलीं, त्या साऱ्या निमित्तांच्या मुळाशीं—तद्वतच तिच्या सहवासांत शक्य तितका जास्त वेळ असावें म्हणून जी कांहीं क्रिया मी केली त्या क्रियेच्या मुळाशीं कांहींतरी एक "**अंतिम**" हेतू दडलेला होता हें मला जाणवलं—नी पुढं मला पटलं कीं, हा जो "अंतिम" हेतू—ही जी अज्ञात मन:स्थिती—तीच अनुबुद्ध मन:स्थिती.—

ज्या भावना मनुष्य मुद्दाम अडवून—दडपून ठेवतो—त्या दडपलेल्या भावना या धरण बांधून अडवून ठेवलेल्या पाण्यासारख्याच बेफाम अन् अमर्याद असतात. कृत्रिम बंधनानं अडविलेल्या पाण्याचा ओघ कायम स्थिर राहणं शक्य नाहीं. बंधारे तोडून वाहण्याची त्याची प्रवृत्ती दिसून येते. तद्वत् या दडपून ठेवलेल्या भावनांची—मनोविकारांची अवस्था असते. कोंडलेली वाफ बाहेरपडण्यासाठीं धडपडत नाहीं कां? —फट सांपडली कीं, एकदम "फुस्स" होऊन बाहेर पडते—अतृप्त अन् दडपलेल्या भावना सुद्धां अशाच तृप्तीसाठीं हापापलेल्या असतात. कोंडलेल्या वाफेला एक रेसभर फट पुरेशी होते—तशीच स्थिती मनुष्याच्या आयुष्यांत एका क्षणापुरती निर्माण होते. एकच क्षण—पण तो असा निर्माण होतो कीं, त्यावेळीं त्याच्या साऱ्या जीविताची नासाडी होते, वेळप्रसंगीं मनुष्य माणुसकी सोडून वागूं लागतो तो याच क्षणीं! हाच खरा मोहाचा क्षण!

यावेळीं मनुष्याच्या सत्प्रवृत्ती सुप्तावस्थेंत दडी मारून बसलेल्या असतात; विवेक बुद्धी नष्ट होते ती याच क्षणीं. एकप्रकारच्या भावनोद्रेकानें मनुष्य वेडा बनतो, बेहोप होतो! आणि या बेहोष परिस्थितींतच तो—दडपून ठेवलेल्या भावनांची तृप्ती करून घेतो.—हीच मानवी मनाची धुंदावस्था—अनुब्दुद्धावस्था!—अव्यक्त मनाचें स्वरूप तें हेंच!—

मेनकेला पाहून विश्वामित्राचें तापसीतेज फिकें पडलें—आणि मग मी कोणी असा शुकमुनी नव्हतों-कीं स्त्रीची मोहिनी माझ्या मनावर पडणं शक्य नाहीं असं भासवायला?—

रम्य संध्याकाळ—पूर्ण एकांत—चित्त छेदक तिचें विरही सूर—आकर्षक वेशभूषा तिची—आणि—

**"आननी हृद्रम्य सन्ध्याकाल शान्ती<br>नेत्र हें कीं हासरे सारे दिनान्ती"**

अशी ती सुन्दर शशिकला........

मी म्हणजे माणूसच आहें.—पशू नव्हें,—पशूला सुद्धां विकार अन् वासना असतात—मग त्याच वासना अन् विकारांनीं माझ्या मनावर ताबा चालविला तर नवल तें काय?—

पण वासना आणि विकार या शरिराची तहान भूक—शमविण्यासाठीं निर्माण झालेल्या असतात. मनाची तहानभूक ही या विकारवासनांपासून कधींही शमणें शक्य नाहीं.

"प्रेम प्रेम" ज्याला म्हणतात तें मला कांहींच कळत नाहीं.

मी असं म्हणेन—प्रेम बीम कांहीं एक नसून—शारिरिक आकर्षत्वाचा तो परिणाम असणं शक्य आहे. प्रेमांत इतर कांहीं उच्चतम भावनांचा वास असतो असं म्हणतात—खरं असेल तें ! पण प्रथमतः प्रेम मनांत रुजण्याला सौंदर्याचीच जास्त मदत होत असली पाहिजे. शारीरिक सौंदर्याशिवाय मन आकर्षिलें जाणार तरी कसें? मग प्रत्येकाची सौंदर्याविषयींची भावना निराळी असूं शकेल——जगांत असा एकही मनुष्य सांपडणार नाहीं, कीं त्याच्या मनावर सौंदर्याचा यत्किंचितही परिणाम होणार नाहीं.——अशक्यच असा मनुष्य सांपडणं !——

प्रथमतः शारिरिक आकर्षण—आणि नंतर इतर उच्चतम भावना—या साऱ्यांच्या मिश्रणानें "प्रेम" या नांवाची एक अद्भुत चीज निर्माण होते. शारिरिक आकर्षणाचा मनावर परिणाम होऊं लागला, म्हणजे एकमेकांना सहवासाची अपेक्षा भासूं लागते. सहवास वाढूं लागला म्हणजे एकमेकांच्या चांगल्यावाईट गुणांची जाणीव होऊं लागते. अशा वेळीं दृष्टीला अंधत्व येऊन वाईट गुण सुद्धां चांगले आहेत असं वाटून त्याबद्दल कौतुक करावंसं वाटतं. दोषास्पद गुण कौतुकास्पद होतात—अन् शारिरिक आकर्षणाबरोबरच मानसिक आकर्षणही वाढूं लागतें हळूहळू ! आणि याचवेळीं आपला एकमेकांवर सर्वस्वी मालकीहक्क आहे असं वाटूं लागतं व त्याप्रमाणें वागणुकींतही फेरबदल होऊं लागतो.——प्रेमी व्यक्तीशिवाय इतरांबरोबरच्या वर्तणुकींत दृग्गोचर होणारा संकोचितपणा नष्ट होऊन त्या ठिकाणीं मूर्तिमंत अनिर्बन्ध स्वातंत्र्य खेळूं लागतें.——

आणि शेवटीं हेंच अनिर्बंध स्वातंत्र्य वेळप्रसंगीं साऱ्या जीविताची नासाडी केल्याशिवाय राहत नाहीं.

मी चुकलों—जें करूं नये तें केलें—म्हणजे भलतं सलतं नव्हे—फरक एवढाच कीं, ज्या वयांत जें करूं नये तें केलं.—

अकालीं आंब्याला मोहोर आला तर अशुभ समजतात—वाईट असतं तें असें म्हणतात.—

प्रेम करायला—मला अद्याप अधिकार पोंचला नव्हता. प्रेम ही चीज सांगून निर्माण होत नाहीं—ती आपोआपच रुजते असं म्हणतात—खोटं आहे तें त्यांचं म्हणणं—निदान मला तसं वाटतं. प्रेमाच्या वृद्धीला ज्ञानाची आवश्यकता—मनाचा थोरपणा आणि वयाची वाढ यांची जरूरी असते.—यांपैकीं माझ्याजवळ एकही गुण नाहीं—मग मला प्रेम करायचा अधिकार पोहोंचला कसा ?

ज्ञानाची आवश्यकता—शिक्षण सोडून स्वस्थ बसलों—लोक उनाड म्हणूं लागले म्हणून लेखन व्यवसाय पत्करला. लोकांच्या मनाची फसवणूक करून स्वत:कडे मोठेपणा घेतला; पण म्हणून माझं ज्ञान वाढलं असं मला म्हणतां येणार नाहीं.—अर्थात् ज्ञानाचा अभाव—दुसरी गोष्ट मनाचा थोरपणा—मी तर नीचवृत्तीनें या मार्गाला लागलों होतों. सूड घेणें म्हणजे सुद्धां नीच वृत्ती समजली जाते. जशास तसें वागायला हवं हें कबूल आहे. पण कुत्रं चावलं म्हणून उलट कुत्र्याला चावणं हें नीचत्वाचं लक्षणच नव्हे काय !—सूड घ्यायचं ठरवून मी शशिकलेला वश करूं पाहिलें; माझा प्रयत्न साध्य झाला—पण त्या

ठिकाणीं माझ्या मनाच्या थोरपणाचा लोप पावला. मी माणुसकी सोडून वागलों—तिसरी गोष्ट वयाची वाढ—असं काय माझं वय पूर्णतेला पोहोंचलं होतं म्हणून शशिकलेच्या सहवासाचा हव्यास माझ्या मनाला लागावा ? एकूण झालं तें फारच वाईट झालं असं वाटूं लागलं. मन पस्तावलं आणि शेवटीं शक्य तितकं तिच्यापासून दूर राहायचं असं मीं ठरवलं !—

# प्रकरण ६ वें—मर्मभेदक वार्ता.

## शशिकलेनें लिहीलेली हकीकत

मी त्यादिवशीं कवि चंद्रशेखरांचीं उत्तमांतलीं उत्तम भावगीतं म्हणत होतें—आणि मध्येंच एक भावगीत म्हणतांना मी देहभान विसरलें—आजूबाजूच्या जगालाही विसरलें—इतकी मी तल्लीन झालें होतें. मोर आपला पिसारा उभारून मेघमंडळाकडे पहात आजूबाजूच्या जगाला विसरून अगदीं तल्लीनतेनें नाचतो—स्वतःचें देहभान सुद्धां विसरतो तो त्यावेळीं—अगदीं तश्शी स्थिति झाली होती माझी! मी भावगीत म्हणत असतांना मध्येंच आई खोलींत आली होती—मला कळलं होतं तें—पण गीत म्हणण्यांत मी इतकी रंगलें होतें कीं, तें मध्येंच थांबवावं असं मला वाटेना!

"थोडी बाहेर जाऊन येत्यें हं—दाराकडे लक्ष असूं दे."—आईनें हुकूम फर्मावला—मी मानेनेंच—भावगीत म्हणत असतांना—"होय" चा अर्थ आईला पटविला—आई आंत गेली—नी नंतर थोड्यावेळांनीं—ती बाहेर गेली असावी असं—बाहेरच्या दरवाजाचा 'किर्रर'—असा जो आवाज मला ऐकूं आला त्यावरून मी जाणलं.

आतां तर घरांत कुणीच नव्हतं—दरवाजाही पुढं केलेला होता, तेव्हां त्याकडे सारखं लक्ष देण्याची कांहीं जरूरी नव्हती—कुणीही दरवाजा उघडून आंत येऊं लागला असता तर दरवाजाच्या आवाजा-

वरून कोण आहे तें मला झटकन् पाहतां येण्यासारखं होतं.—मी दादांच्या खोलींत गेलें, हातपेटी आणली नी दरवाजासमोरच असलेल्या माझ्या खोलींत मी बसलें–चंद्रशेखरांची "चंद्रिका" उघडली–आणि मला आवडेल तें एक एक भावगीत मी अगदीं सुरांत म्हणण्याचा प्रयत्न करूं लागलें.

दोन तीन भावगीतं म्हटलीं मी–आणि एक भावगीत म्हणतांना मी इतकी तल्लीन झाल्यें कीं, दरवाजा उघडून चंद्रकांत आले–ते माझ्या खोलीच्या दरवाजांत येऊन उभे राहिले, तरी तें मला कळलं नाहीं.

तें भावगीत इतकें गोड नी कर्णमधूर होतं कीं, एकाद्या अरसिकाच्या मनालाही त्यायोगानें भुरळ पडली असती.—पण तें जितकं गोड नी कर्णमधूर होतं तितकंच तें कारुण्यपूर्ण नी हृदस्पर्शी होतं–त्यांत व्यक्तिविलेल्या भावना–मनाचा ठाव घेत असत–आणि विरहानें त्रस्त झालेल्या व्यक्तीच्या मनाचा अविष्कार अगदीं स्पष्ट नी सोप्या भाषेंत दाखविल्यामुळें जणूं कांहीं आपण व्यवहारांतल्या विरहानें त्रस्त झालेल्या प्रत्यक्ष व्यक्तीच्याच हृदयाचा कानोसा घेत आहोंत कीं काय–असं वाटल्याविना खचित रहात नसे.

मी माझं अंत:करण चंद्रकांतांपुढें खुलं केलं असूनही चंद्रकांतांनीं त्याकडे लक्ष दिलं नाहीं–माझ्या मनाला किती दु:सह वेदना होतील याचा विचारही न करतां माझ्या म्हणण्याला "नकार" दिला असल्यामुळें आधींच माझं मन विरहानं व्याप्त झालं होतं. आणि

अशांत तें आतांचं भावगीत—मग तर कांहीं विचारायला नकोच! माझ्या हृदयाला कसलेतरी चटके बसत होते.—तरी पण तें बंद करावं असं वाटत नव्हतं—मी तें सारखं म्हणतच होतें—नकळतपणें माझ्या नेत्रांतून अश्रूधारा सारख्या वहात होत्या. आणि विशेषतः माझ्या हृदयाचा ठाव घेतला त्या या ओळींनीं—

**"येशिल नाथा! पुन्हा कधीं ह्या खंतीनें सारखी?**
**अनाथा तळमळते ही सखी;**
**किती निसासे त्यजितें, झिजतें, मी बरळे, विव्हळे,**
**वियोगें अशी, तुझ्या आहळें;**
**पाडुनी या हृदयाला घरें**
**करुनी शांतीचें खोबरें**
**छळिती किती विपदा-संघ रे!..........."**

मी तें भावगीत सारखं घोळून घोळून म्हणत होतें. माझ्या अं:तकरणाचा जणूं एक कप्पाच पूर्ण ओझ्यानं व्याप्त झाला असावसं वाटूं लागलं. माझ्या नेत्रांतून अश्रू वहात होते. मला यावेळीं वीर-हाच्या दारुण यातनांची जाणीव झाली.

मी ती शेवटची ओळ म्हणायला, नी चंद्रकांतांकडे लक्ष जायला एकच गांठ पडली.—यावेळीं चंद्रकांत अगदीं माझ्याजवळ पेटीला बिलगून उभे होते. मी त्यांच्या चेहऱ्याकडे पाहिलं मात्र; तत्क्षणीं माझ्या सर्वांगावर रोमाञ्च उभे राहिले. मी झटकन् दोन पावलं मागें सरलें. त्यांच्या चेहऱ्यावर कांहींएक निराळाच भाव दृग्गोचर होत होता.

ते कसल्यातरी तंद्रींत असावेत—असं त्यांच्या एकंदर हावभावावरून मी जाणलं—मी आणखी थोडी मागं सरूं लागलें होतें—इतक्यांत चंद्रकांतांनीं माझा उजवा हात धरला अन् अत्यंत आवेशानें आपल्या हृदयाशीं त्यांनीं मला कवटाळून धरलं.—मी भीतीनें गांगरलें नाहीं—तरी पण माझी छाती धडधडूं लागली.—हृदयाचा धडधडाट स्पष्ट ऐकूं येऊं लागला—सर्व गात्रं गलित झाल्याप्रमाणें वाटलं. एका क्षणांत अंगावर कांट्याचें जाळें विणलें गेलें.

अन् अगदीं निःसहाय्यतेनें मी चंद्रकांतांच्या हृदयावर मस्तक ठेवलें.

पहिली भीति ओसरली—नी नंतर दुसऱ्याक्षणीं अंःतकरणांत सुखोपभोगी झटके बसूं लागले.—मी हळूच वर चद्रकांतांच्या मुखाकडे पाहिलं—माझं तोंड लालबुंद झालं—कानशीलं तप्त झालीं.—माझ्या मस्तकावरून चंद्रकांतांनीं आपला हात फिरवला—माझ्या आयुष्याचीं इतिकर्तव्यता झाली असं वाटलं मला. माझ्या अंतःकरणांत कसलीतरी जोराची खळबळ माजून राहिली.—ऊर गुदमरूं लागला—पण भीतीनें नव्हे—तर सुखोपभोगी भावनेनीं.—

त्यांनीं माझ्या हनुवटीला धरून तोंड वर उचललं.—

मी किलकिल्या नजरेनें त्यांच्या चेहऱ्याकडे पाहिलं. त्यांच्या नेत्रांत कांहींएक निराळीच विलक्षण चमक मला दिसून आली.—कांहीं क्षण मी पाहिलं असेन चेहऱ्याकडे—तेही माझ्या चेहऱ्याकडे न्याहाळून पाहूं लागले. दृष्टीला दृष्टी मिळाली.—अंतःकरणाची साक्ष पटली.

त्या हृदयानें दिलेल्या सादेला या हृदयाकडून साद मिळाली परस्परांच्या भावनांची जाणीव झाली अन् मी जास्तच त्यांच्या बाहूंत शिरलें.— माझी ती चळवळ पाहून त्यांनींही मला आपल्या बाहूपाशांत जास्तच आवळून घेतलें–नी वर उचलेल्या माझ्या तोंडावर–थरथरत्या ओठां-वर त्यांनीं आपले ओंठ ठेवले.—एक दीर्घ–भरीव कडकडून चुम्बन घेतलं त्यांनीं माझं!–माझ्या अंगावर रोमाञ्च उभे राहिले.—नकळत-पणें एकदम अमृताचा घोट जिभेवर यावा अन् त्यायोगानें अंत:करणांत सुखाच्या उकळ्या फुटाव्यात–तद्वत माझ्या अंत:करणांत कसल्यातरी अननुभूत–पण गोड लहरी तरंगूं लागल्या.

त्यांनीं पुन्हा माझ्या चेहऱ्याकडे कांहीं सेकंद न्याहाळून पाहिलें.— एका चुम्बनानं त्यांचं समाधान झालंसं दिसेना त्यांनीं आणखी एकदां माझ्या उजव्या गालांचें भरीव–दीर्घ चुम्बन घेतलं. मला मात्र हाल-चालसुद्धां करावीसें वाटेना!—कांहीं सेकंद मी त्या अननुभूत आनंदांत तल्लीन झालें होतें–तितक्यांत चद्रकांतांनीं मला दूर लोटलं.—जणुं– विषाचा प्याला झिटकारल्याप्रमाणें मला फेंकून देऊन झटकन् बाहेर निघून गेले.

मला राहवेना–मी त्यांना दोनतीन हांका मारल्या–त्या त्यांना ऐकूंही गेल्या असाव्यात अशी माझी खात्री होती. पण पुन्हां मन मोहाला बळी पडेल म्हणून मागें वळूनसुद्धां पाहायला ते तयार नव्हते.—ते अगदीं दिसेनासे होईपर्यंत त्यांच्या पाठमोऱ्या आकृतीकडे मी सारखी एखाद्या भ्रमिष्टांप्रमाणें पहात उभी राहिलें.

भावनांचा अतिरेक झाला म्हणजे मनाचें अस्तित्व तेवढ्यावेळपुरतें नष्ट होतें–विवेक मरतो.—

माझीही तीच अवस्था झाली होती.—मी चंद्रशेखरांचं तें भावगीत म्हणत होतें.—अन् त्या भावगीतांत चित्रीत केलेल्या भावना माझ्या अंत:करणांत उचम्बळून येऊं लागल्या– त्याचवेळीं चंद्रकांत दारांत येऊन उभे राहिले–त्यांच्याकडे एकच क्षण मी डोळे भरून पाहिलं मात्र–अन् तत्क्षणीं मी समाधानाचा सुस्कारा सोडला. मी त्या गीतांत.—

**“ येशिल नाथा पुन्हा कधीं ह्या खंतीनें सारखी;**
**अनाथा तळमळते ही सखी ॥ ”**

........हे चरण म्हणत होतें.—आणि वाटलं मला कीं; आतां माझा नाथ आला !—आतां कशाला तळमळायला हवं ?—

मी पेटी बंद केली–गीत म्हणणं पुरें केलं !—आणि दारांतून माझ्याजवळ येऊन उभ्या असलेल्या चंद्रकांतांकडे अगदीं टक लावून न्याहाळून पाहूं लागलें. सारासार विचार लोपला, विवेक मृत्यू पावला अन्.........................? ? ?

पण आतां काय ? चंद्रकांतांनीं मला लोटलं अन् आवेशानें ते निघून गेलें. मी मात्र कांहीं क्षणापूर्वीं उपभोगायला मिळालेल्या गोड सुखाच्या, गोड–पण चटका लावणाऱ्या आठवणीनें मनांत झुरत इथं उभी आहे.—

चंद्रकांताना काय वाटलं असावं ? ते मला असं एकाएकीं लोटून कां बरं गेले ? मी पसंत नाहीं कां त्यांना ? पण छे; हा विचार

आला तरी कसा माझ्या मस्तकांत ? मी पसंत नसतें तर इथं येऊन त्यांनीं माझं चुम्बन घेतलंच नसतं ! मी त्यांना पसंत आहें खात्रीनें पसंत आहें.—

....या, आणि अशाच किती तरी गोष्टी, कीं ज्या चंद्रकांतांचं मन विशेष आकर्षूं शकल्या त्या माझ्या दृष्टीपुढें थैमान घालीत होत्या.

पण इतकं असूनही त्यांनीं मला दूर कां लोटावं याचा मी विचार करूं लागले—माझ्यांत काय उणीव आहे हें मी पडताळून पाहूं लागले. गुण म्हणावेत, तर असा कोणता माझ्यांत दुर्गुण आहे कीं, तो त्यांचं मन खट्टू करण्यास निमित्त मात्र झाला ? नाहीं म्हणायला मी थोडीशी खुनशी आहे—माझं मला कळतं आहे तें—पण तेवढ्यानें ते रुष्ट होतील हें शक्य नाहीं. आतां शील म्हणावं तर माझी मला खात्री आहे कीं, माझं शील उत्तम—निष्कलंक आहे. अद्याप तरी मी चंद्रकांतांकडे ज्या भावनेनें पाहतें आहे त्या भावनेनें इतर कोणत्याही पुरुषांकडे मी पाहिलं नाहीं. अर्थांत शीलाचा तद्वत् गुणाचाही प्रश्न मिटला.—आतां कर्तव्य तत्परता.—

मी विचार तरी किती आणि कोणत्या कोणत्या गोष्टींचा करणार ? तसंच शोधूं गेलं, तर मनुष्याला आवश्यक असणारे असे किती तरी सद्गुण सांपडतील पण म्हणून तेवढे सारे अंगीं असणं शक्य आहे कां ? मनुष्य सर्वगुणसंपन्न असतो असं थोडंच आहे !—खूप विचार केला. विचार करून करून मस्तक बधीर झालं—कांहीं वेळ मी भांबावून गेलें—नी शेवटीं आतां विचारच करायचा नाहीं असं

ठरवून मी उठलें नी थोडा वेळ बागेंत बसावं म्हणून बाहेर आलें.— आमच्या दारालगतच बाग होती. मी कांहींशीं पुढें गेलें. आमच्या बागेंत हिरव्या चाफ्याचं झाड लावलं होतं तें आतां चांगलंच फोंफावलं होतं. त्याचा सुगंध चहूकडे दरवळत होता. वाटलं तिथेंच बसावं. आणि मनाच्या त्या सहजप्रवृत्तीप्रमाणें माझें पायही आपोआपच तिकडे वळाले.

मी त्या झाडापर्यंत जातें आहे, तोंच त्या झाडाखालीं कुणीतरी बसलेलं दिसलं मला. मी नेत्र विस्फारून पाहिलें नी आश्चर्यानें स्तंभितच झालें!

दोन्ही हातांनीं आपलं मस्तक घट्ट धरून खालीं जमिनीकडे पहात सचिंत मुद्रेनें व्याप्त झालेले ते चंद्रकांत होते.

मी झपझप पावलं टाकीत त्यांच्याजवळ गेलें नी त्यांचे दोन्ही हात धरून विनित पण कळवळ्या स्वरानें त्यांना हांक मारली मी. त्यांनीं माझ्याकडे पाहिलं. कांहीं सेकंद ते टक लावून पाहात होते. त्यांचा चेहरा खिन्न दिसत होता. त्यांच्या डोळ्यांत अश्रू चमकत होते. माझ्या हातांत कांहीं क्षण त्यांचे हात होते; पण पुढें हळूहळू हात सोडवून घेतले त्यांनीं. माझ्या चेहऱ्याकडे कांहीं क्षण पुन्हां न्याहाळून पाहिलं अन् कां, कोण जाणे; लगेच ते दूर दूर झाले माझ्यापासून. पाहातां पाहातां बागेच्या बाहेर पडले ते.

माझ्यांत कांहींतरी उणीव आहे याची तीव्र जाणीव झाली मला. उणीव असल्याशिवाय ते माझ्याशीं इतकं फटकून वागलेच नसते.

माझ्या मस्तकांत कसले तरी असह्य घाव बसत होते. जीव त्रस्त झाला. मला नीटसं उभंही राहवेना. मी मटकन् तेथल्याच बाकावर बसलें. आणि त्या बाकाला असलेल्या हातावर मी माझे दोन्ही हात पसरून त्यावर मस्तक ठेवून रडूं लागलें. माझ्या नेत्रांतून अश्रूंचा पूर लोटत होता.

   

वीस दिवस झाले तरी माझी अन् चंद्रकांतांची भेट झाली नाहीं.

दादा गांवाला गेले होते. ते कोणत्या गांवाला आणि कां गेले हें मला काल कळलं होतं. आणि म्हणूनच मुद्दाम चंद्रकांतांना भेटावं असा मी विचार केला. त्यांना भेटल्याशिवाय आतां गत्यंतरच नव्हतें. कारण दादा गांवाला गेले होते ते माझं लग्न ठरविण्यासाठीं.— ???

मला ज्यावेळीं ही बातमी समजली, त्यावेळीं एकदम एका मोठ्या हातोडीचा जोराचा घाव कुणीतरी माझ्या छातींत मारीत आहे असं वाटलं मला. डोळ्यांना अंधारी आली, तोंड गोरमोरं झालं. जीभ कोरडी पडली. मी आवंढा गिळला. कांहीं क्षणानं मी भानावर आलें. आजूबाजूच्या वातावरणाची जाणीव झाली. जगाच्या अस्तित्वाला पूर्ण विसरून ऐकलेल्या दुःखकारक बातमींत मी अगदीं भान हरपून तन्मय झालें होतें.—त्या क्षणाचा लोप पावला अन् जगाच्या अस्तित्वाची खात्री पटून आपण ह्या दुःखानें व्याप्त झालेल्या जगांतच आहोंत अशी मनाला जाणीव झाली. कांहीं दिवसांपूर्वी मी प्रो. फडक्यांचें "प्रतिभासाधन" हें पुस्तक मानसशास्त्राचा

अभ्यास करण्यासाठीं म्हणून वाचलें होतें. त्यांत कुठेंसें प्रोफेसर महाशयांनीं लिहिलें आहे कीं,—" जगांत सुखापेक्षां दुःखेंच अधिक आहेत.—गरीबीचा उपहास होतो—प्रेमाला तळमळत राहावें लागतें.—इ० "

या त्यांच्या उद्गाराची सत्यता पटली मला आज ! सारा दिवसभरची माझी वागणूक एकाद्या वेड्यासारखी होती. दुपारीं जेवायला बसतांना आईनें लोणच्याच्या बरणींतून थोडसं लोणचं काढायला सागितलं होतं—मी ऐकलेंहि होतें—पण कशी आणि कां ? कांहीं आठवत नाहीं आतां—मी थेट वर माडीवर गेलें आणि गांवाला जाण्यापूर्वीं दादानीं सबंध एक वर्षाचे ' किर्लोस्कर ' मासिकाचे बारा अंक एके ठिकाणीं बांधून बाईंड करून आणले होते—तें बारा अंकाचें बाईंड बुक मी खालीं आणलें नी आई समोर ठेवलें ! आईनें त्याकडे पाहिलं पुन्हा माझ्याकडे पाहिलं आळीपाळीनें कांहीं न बोलतां ती एकदां माझ्याकडे नी एकदां त्या बाईंड बुकाकडे सारखी पाहूं लागली मला कळेना ती अशी कां पाहूं लागली तें ! ती तर कांहींच बोलत नव्हती पण पाहणं मात्र चमत्कारिक होतं हें मी जाणलं अन् अखेरीस मला राहवेना—मीच म्हणालें— " आई—अशी कां ग पहाते आहेस तूं ? "—

त्यावर " मी तुला काय आणायला सांगितलं होतं ? " असा प्रश्न मला आईनें विचारला !—

मी भानावर आलें ! झालेली चूक उमगली मला ! झटकन् खालीं

वांकून मी तें पुस्तक घेऊं लागलें इतक्यांत पुस्तक घेण्यासाठीं मी जो हात पुढें केला होता तोच हात आईनें धरला नी खालीं जवळ बसण्यास सांगून "शशी, आज झालं आहे काय तुला?" असं अत्यंत प्रेमळ स्वरांत मला आईनें विचारलं!

आईचे ते प्रेमळ स्वरांत उच्चारलेले उद्गार ऐकून मला भडभडून आलं! जीव गुदमरूं लागला, हळूंहळूं हुंदके येऊं लागले.

आईनें माझ्या पाठीवरून हात फिरवला अन्—"सांग ना शशी—तुला काय वाटतं आहे? आजारी आहेस कां?—मघाशीं देखील तसंच केलंस—सुशीचा झबला धुवून आण म्हटलं तर माझं नवं काळं पातळंच भिजवून टाकलंस!—तें पातळ मी मुद्दाम संक्रांति दिवसा-साठीं ठेवलं होतं नी तें तूं आजच भिजवून टाकलंस.—असूं दे आतां म्हणा—पण एकंदरींत आज तूं कांहीं ठिकाणावर नाहींस हें खरं!—सांग, काय होतंय् तुला?—"

मला उमाळा दाटून आला, रडं आवरेना मला—आईच्या कुशींत तोंड खुपसलं नी हुंदके देऊं—देऊं रडूं लागलें मी!—कांहीं वेळ त्या स्थितींत तशीच बसून राहिलें—नंतर उठलें नी मुकाट्यानें तें 'किर्लोस्कर' मासिकाचें बाईंड बुक उचललें; वर गेलें नी होतं त्या जागीं ठेवून दिलं. पुन्हां खालीं आलें. तशीच थेट न्हाणीघरांत गेलें—प्रथम तोंड स्वच्छ धुतलं—डोळ्यांना पाणी लावलं नी घरांत येऊन लोणच्याच्या बरणींतून लोणचं काढलं नी खालीं मान घालून मुकाट्यानें जेवायला बसलें. जेवतांना आईनें अगदीं शिकस्त केली. पण

माझ्या दुःखाच्या कारणाचा मागमूसही मी कळूं दिला नाहीं तिला—तिनें खूप प्रयत्न केला. वकीली डावपेंचानें नाहीं नाहीं ते प्रश्न विचारले. खूप प्रयत्न केला. जंग जंग पछाडलें—पण मीही तिचीच मुलगी होतें.—तिच्या प्रत्येक प्रश्नाला—" हो—नाहीं—हो नाहीं. " या दोन शब्दांपैकीं आवश्यक शब्दाशिवाय तिसरा शब्दच उच्चारला नाहीं मी!—तिचा अगदीं नाइलाज झाला, अन् अखेरीस चिडली ती. संतापानें ती म्हणाली—" मी मेली इतकं विचारतें आहे— पण नीटसं उत्तरही देत नाहींस.—मग झालं ग काय तुला रडालाय? "

आतां मात्र तिच्या या प्रश्नाला कांहीं तरी उत्तर देणं भागच पडलं मला.—न द्यावं तर आई जास्तच चिडीला पेटली असती शेवटीं—" आई, डोकं दुखतंय् ग माझं भारी. " हें उत्तर दिलं! माझं उत्तर ऐकून आईचं समाधान झालं नाहीं हें मी जाणलं—उलट माझं उत्तर खोटं आहे हें आईनं निश्चित ओळखलं असलं पाहिजे हेंही मी जाणलं—पण मी तरी काय करणार? माझा अगदीं नाईलाजच होता. या अशा गोष्टी कां आईला सांगण्यासारख्या असतात? कथा कादंबऱ्यांतून—हल्लींचा काळ पुष्कळच पुढें गेला आहे—मन मोकळेपणीं कोणत्याही गोष्टींची चर्चा आईबापांजवळ मुलांनीं करावी, आईबापांचीही दृष्टी पूर्वींपेक्षां थोडीशीं निवळलेली दिसते—असं वाचायला मिळतं. पण प्रत्यक्ष वस्तुस्थिती फारच भिन्न आहे. यापेक्षां अगदीं उलट आहे. कथा कादंबऱ्यांत वर्णिलेली स्थिती आणि व्यवहारांतली प्रत्यक्ष स्थिति यांत दोन टोकांचें अंतर आहे!—

एक त्या टोकाला, तर एक या टोंकाला. हीं दोन टोकें केव्हां एकत्र येतील हें कांहीं सांगतां येत नाहीं. पण ज्या दिवशीं येतील तो हल्लींच्या सुधारलेल्या काळांतला सुवर्णाक्षरांनीं लिहून ठेवण्यायोग्य असा सुदीनच होय ! त्या दिवशीं जगांतलीं—नव्हें;—अम्हां मध्यम वर्गीय पांढरपेशांतलीं बरींचशीं दुःखं नाहींशीं होतील. कितीतरी गोष्टी आम्हांला आमच्या पालकांजवळ उघडपणें बोलतां येतील. त्यावर वादविवाद—चर्चा करून पुढें कसं पाऊल टाकायचं याबद्दल आम्हांला निश्चित असं कांहीं तरी ठरवितां येईल.—आज या साऱ्या गोष्टींची उणीव तीव्रतेनें भासत असल्यामुळें आम्हांला वागतांना पदोपदीं कशा आणि किती ठेंचा बसत आहेत हें आमचं आम्हांला माहीत. आमच्या मनाची कुचंबणा होते. स्पष्ट बोलायला न मिळाल्यानें एक प्रकारची संकोचवृत्ती कायमची बाणली जाते आणि हळूहळू आमचा स्वभाव कुढा बनत जातो. वास्तविक आजच्या लेखक वर्गांनीं या क्षुल्लक दिसणाऱ्या—पण खऱ्या महत्त्वाच्या—कीं, ज्यामुळें आजच्या समाजाची घडी विस्कटलेली दिसत आहे——त्या मुख्य प्रश्नाकडे जरूर लक्ष द्यायला हवें. तसा प्रयत्न अद्याप कोणी केला आहे असं वांटत नाहीं मला ! अद्याप समाजानें हा प्रश्न विचारांत घेतला नाहीं. आणि म्हणून मला—मलाच काय, पण माझ्यासारख्या परिस्थितींत सांपडलेल्या कितीतरी तरुणींना—मनांतल्या खळबळी मनांतच दडपून—निवांतवेळीं एकटीलाच अश्रू गाळावे लागत आहेत. त्या अश्रूच्या प्रत्येक थेंबांत सांठलेलें आमचं दुःख—आमच्या तोंडून

बाहेर पडणाऱ्या प्रत्येक हुंदक्यांत दबलेली आमची मनोवृत्ती—जशीच्या तशीच राहात आहे. ती कमी न होतां उलट वाढतच आहे. आईबापांना आमचीं दुःखं मोकळेपणीं सांगावींत म्हटलं तर—उलट "पोरगी बिथरली जास्त" असा टोमणा मिळून वर ते रुष्ट होण्याचाच संभव जास्त !—

मग मी तरी आईला खरी वस्तुस्थिती कशी कळविणार ?

जेवण झालं—मला कांहीं आज विशेष भूक नव्हतीच मी तडक वर गेलें. नी गादीवर अंग टाकून दिलं.

बराच वेळ मी रडत होतें. माझ्या दुःखाचं कारण फक्त माझं लग्न !—आणि तें माझ्या इच्छेविरुद्ध !—चंद्रकांतांशीं लग्न करावं ही माझी इच्छा पण मी ही इच्छा सांगणार कुणाजवळ ? पोरगी मोठी होत चालली—गळ्यांत धोंड पडूं लागली म्हणून दादा स्वतःवरची समाजानें लादलेली जबाबदारी टाळण्याची शक्य तों खटपट करीत होते. पण त्या त्यांच्या खटपटीबरोबरच माझ्या साऱ्या आशा आकांक्षांचा चुराडा होणार हें त्यांना तरी कळायला काय मार्ग आहे ?

मी ज्या भावनेनीं चंद्रकांतांकडे आजपर्यंत पाहिलं त्या भावनेचा मला चक्काचूर करावा लागणार या विचारानें मन त्रस्त झालं.—कांहीं सुचेना मला. डोळ्यांपुढें काजवे चमचमूं लागले.—पण अदृश्य काजव्याचा थोडासाही प्रकाश माझ्या हृत्पटलावर पडेना !—कांहीं वेळानें मी उठलें—चंद्रकांतांना भेटावंसं वाटलं म्हणून खालीं आलें—

तोंड वगैरे धुतलं–पातळ नीट व्यवस्थित नेसलें नी चंद्रकांतांच्या घराचा रस्ता धरला.

### चंद्रकांतानें लिहीलेली हकीकत:—

भावनोद्रेकानें माझ्याकडून त्या दिवशीं ती चूक झाली, पण त्यानंतर मात्र कांहीं झालं तरी तशी चूक होऊं नये याबद्दल मी फार खबरदारी घेत होतों. मी कितीही खटपट केली, तरी मनोविकारांवर जय मिळवणं मला अशक्य होतं–हें मी जाणीत होतों—आणि म्हणून मी त्यानंतर शशिकलेची भेटसुद्धां घ्यायची नाहीं असं ठरविलं होतं—आज बरोबर महिना झाला असेल–माझी अन् शशिकलेची म्हणावी तशी भेट झाली नव्हती. प्रथम प्रथम मला थोडंस जड गेलं हें–पण आतां अलीकडे त्याचं कांहीं वाटेनासं झालं होतं. नित्य क्रम सुरळीत चालत असे.—सूर्य पूर्वेकडे उगवतो, मध्यान्हींत डोक्यावर येतो, नी सायंकाळीं पश्चिमेकडे मावळतो. अगदीं त्याप्रमाणें माझा कार्यक्रम नियमीतपणें चालला होता. सकाळीं उठायचं; प्रातर्विधी आटोपून लायब्ररींत जायचं; साधारण साडे दहा अकरा पर्यंत मिळतील तीं वृत्तपत्रं वाचायचीं—आणि नंतर घरीं परत येऊन जेवण वगैरे उरकायचं–दुपारीं पुस्तक वाचायचं–संध्याकाळीं मित्रांसमवेत नदी-कांठीं–किंवा पुलावर फिरायला जायचं.–रात्रीं वाटलं तर लिहायचं नाहींतर स्वस्थपणें झोंप घ्यायची.—असा माझा दिनक्रम होता. त्यांत बदल नाहीं–कीं कांहीं नाहीं—रोज तेंच तें न् तेंच तें!—

पण आज मात्र मला चमत्कारिक असं कांहींतरी व्हायला लागलं! माझ्या छातीच्या डाव्या बाजूला कसलेतरी क्षणाक्षणाला धक्के बसूं लागले. कांहींवेळ मी भांबावून गेलों. माझी चित्तवृत्ती थरथरली—क्षणभर मी अगदीं दिग्मूढ–होऊन गेलों. माझ्या स्वतःच्याच अस्तित्वाची मला शंका वाटूं लागली. मी कुठें आहे–काय करतो आहे.—कशा स्थितीचा अनुभव घेत आहे, याबद्दल मला कांहींच उमग पडेना!

आणि या स्थितीला कारणीभूत होणारी एकच गोष्ट! ती म्हणजे मला काल एक मर्मभेदक वार्ता कळली होती. शशिकलेचं लग्न जमत असून तेवढ्याचसाठीं वाटाघाट करण्याबद्दल तिचे वडील परगांवीं गेले होते. ज्यावेळीं मला ही बातमी समजली ·त्यावेळीं तर माझा विश्वासच बसेना त्या वार्तेवर. प्रथम तर मी स्वप्नांत नाहींना–अशी मला भ्रांत पडली. पण कांहीं क्षणानं मी भानावर आलों—आणि हळूहळूं माझ्या वृत्ती ताळ्यावर येऊं लागल्या. ती बातमी सांगणारी व्यक्ती माझ्याच घरांतली असून अगदीं सहजासहजीं—नित्याच्या गोष्टीप्रमाणें ती बातमी तिनें सांगायला सुरवात केली असल्यामुळें ती खरी असावी असं नंतर मला वाटूं लागलं–व तिच्या असत्या विषयींच्या शंकेचा लोप झाला. ही झाली कालची—ज्यावेळीं मला ती वार्ता कळली होती–त्यावेळची स्थिती. पण आज?–आज माझी स्थिति कांहीं चमत्कारिकच झाली होती.–माझीं गात्रं बधीर झालीं आहेत असा क्षणोक्षणीं मला भास होत होता.—एकाद्या

दारू प्यायलेल्या मनुष्याप्रमाणें माझ्या तोंडून कांहींतरीच असंबद्ध उच्चार बाहेर पडूं लागले. क्षुल्लक कारणावरून सुद्धां माझ्या रागाचा पारा आज वर वर चढत होता.—

इतके दिवस मला हें आकर्षण केवळ वैषयिक भावनेनेंच निर्माण झालं असलं पाहिजे असंच वाटत होतं. पण आज मात्र त्या समजुतीचा नायनाट झाला. आणि त्यापेक्षांहीं कांहीं तरी उच्च भावनेचा वास हृदयांत करीत असलाच पाहिजे असं खात्रीपूर्वक मला वाटूं लागलं! तिचा आणि माझा आज बरेच दिवसांपासूनचा सहवास होता. नित्य निकटच्या सहवासामुळें साहजिकच दोघांच्याही मनांत एकमेकांविषयींची आपुलकीची भावना निर्माण झाली. आपुलकीच्या भावनेची जसजशी वृद्धी होत गेली—तसतशी एकमेकांना एकमेकांबद्दल आस्था, कळकळ वाटूं लागली! तिच्या घरांत कांहीं कारणामुळें तिला जर कुणी बोललं तर मला वाईट वाटत असे! तिच्या हांतून कितीही अक्षम्य चूक झाली तरी तिला कुणी बोलूं नये असंच मला वाटूं लागलं. तिची चूक तिच्या निदर्शनाला आणायचीच झाली तर माझ्याशिवाय ती इतरांनीं कोणी आणूं नये असं वाटून—मालकी हक्काची जाणीव झाली! तिचा माझ्यावर किंवा माझा तिच्यावर मालकी हक्क आहे असं आम्हां दोघांनाही वाटूं लागलं.

या, किंवा अशाच इतर काहीं उच्च भावनांचा उदय होऊं लागला तसतसें एकमेकांना कायम सहवासाची आवश्यकता भासूं लागली. मनाच्या या सहज प्रवृत्तीप्रमाणें हळूहळू आमच्या

वागण्यांतही फरक होऊं लागला आणि अखेरीस त्याचा परिणाम अगदींच अनिष्ट नसला तरी निदान माझ्या स्वतःच्या दृष्टीनें तरी तो अनिष्टच झाला. मला त्याबद्दल पश्चात्ताप वाटत होता. मनाला सारखी बोचणी लागली होती. एकदम त्या थराला जायला नको होतं असं आतां मला वाटूं लागलं पण त्याचं आतां काय? झाल्या गोष्टी होऊन गेल्या होत्या!—

काल मला ती मर्मभेदक वार्ता—शिळोप्याच्या गप्पांतच—झोडल्या जाणाऱ्या इतर बातम्यांसारखी कळली होती पण आज खुद्द शशिकलेनीच मला सांगतली!

सकाळची वेळ होती ती; मी नुकताच उठलों होतों. शौच-मुखमार्जन करून वर आलों. मी कधीं चहा घेत नसे; पण आज घ्यावासा वाटला म्हणून ताईला चहा करायला सांगून तसाच थेट मी माझ्या खोलींत गेलों. कॅलेंडरवरील तेवीस तारीख फाडली. दिवसभर तो तारखेचा कागद एकाद्या आज्ञाधारक नोकराप्रमाणें आपलं काम बजावीत होता. महिन्यांतला आजचा तेवीसावा दिवस आहे असं तो आपल्या अस्तित्वानें जगाला पटवीत होता. पण मी त्याच्या अस्तित्वाचा नाश केला. कांहींसुद्धां विचार न करतां मी फाडला आणि तो बाहेर फेंकून दिला. तितक्यांत ताईनें चहा झाल्याची वर्दी दिली म्हणून उठलों नी स्वयंपाक घरांत गेलों; ताईनें चहा कपांत ओतला आणि कप माझ्यापुढें ठेवला. मी बशींत चहा ओतून घेऊन आतां पहिलीच बशी ओठाला लावणार इतक्यांत

शशिकला आंत आली. त्यावेळीं तिचा चेहरा अगदीं उदास आणि खिन्न दिसत होता.—

तिच्या घरांत तिचा धाकटा भाऊ किंवा बहीण—किंवा वेळ प्रसंगी तिची आईही कधींना कधींतरी आजारी पडत असे! एकदां—भाऊ—तर एकदां बहीण—किंवा वेळीं दोघेंही एकदमच अंथरूण धरीत असत. म्हणजे त्यांच्या घरांतली औषधाची बाटली सहसा चुकत नसे! दवाखान्यांत जाण्याचा रस्ता आमच्याच घरावरून होता. दवाखान्यांत जातांना रोज थोडावेळ तरी ती घरांत येई आणि मग पुढें जाई! मी रोज सकाळींच लायब्ररींत जात असल्यामुळें तिची माझी गांठ सहसा कधीं पडत नसे. पण आज मला चहा घेण्याची हुक्की आली, आणि तेवढ्यासाठीं मला थांबावं लागलं म्हणूनच तिची माझी गांठ पडली. ती दवा-खान्यांत आपल्या आईला औषध आणायला जात होती. जातांना नित्याप्रमाणेंच ती आंत आली होती.

मी कपांतला निम्मा चहा तिच्यापुढें ठेवला आणि तो घेण्या-विषयीं तिला आग्रह करूं लागलों. चहाचीं इतर घाण झालेलीं भांडीं, आणि काल रात्रीचीं स्वयंपाकाचीं खरकटीं भांडीं तशींच पडलीं होतीं, तीं भांडीं घेऊन विसळण्यासाठीं ताई मघाशींच खालीं नळावर गेली होती. शशिकलेनें विशेष आढेवेढे न घेतां मी दिलेला चहा घेतला. चहा पिऊन मी उठलों. शशिकलेपुढें कप ठेवल्यामुळें ती कपानेंच फुंकून फुंकून पीत होती. मी बशी खालीं ठेवून

उठलों तितक्यांत ताई कशासाठीं तरी वर आली आणि शशिकला चहा पित आहे हें पाहून तिनें कांहीं एका निराळ्याच दृष्टीनें माझ्याकडे पाहिलं. मला संकोच वाटला. मी झटकन् माझ्या खोलींत निघून गेलों!—

थोड्यावेळानें शशिकलाही दवाखान्यांत निघून गेली. नेहमींप्रमाणें लायब्ररींत जाऊन बसावं असं मला आज वाटेना! काल लायब्ररींतून मी "शाप" कादम्बरी वाचायला आणली होती. ती अद्यापि वाचून झाली नव्हती. तेव्हां घरीं बसून ती वाचावी असं ठरवून मी लायब्ररींत जाण्याचा बेत रद्द केला! गल्लींत कुठेंसा मुंजीचा समारंभ होता. तिथें ताई गेली होती. मी खोलींत "शाप" वाचीत बसलों होतों. वाचतां वाचतां "शाप" चा पूर्वार्ध लिहावा असं मला वाटूं लागलं. निशीकान्ताचं विद्यार्थीदशेंतलं आयुष्य रंगविल्यास चित्तहारी नी मनोरंजक होऊन विद्यार्थ्यांना बोधप्रदही होईल असं मला वाटलं. आणि पूर्वार्ध लिहायचा तर कुठल्या प्रसंगापासून लिहायला सुरवात करावी असा मी विचार करूं लागलों. विचार करतां करतां—सुहासची नी निशाकांताची प्रथम ओळख ज्यावेळीं झाली;—म्हणजे निशाकांत सुहासच्या बंधूकडे—विभाकराकडे अभ्यासाला आला होता त्यावेळीं त्यानें सुहासला प्रथमच पाहिलें होतें तेथून सुरवात करावी आणि अखेर तो बॉम्बच्या कटांत सांपडून त्याला सजा झाली आहे व कोर्टांतून शिपायांबरोबर जात असतांना तिथेंच त्याची व सुहासची गांठ पडते असं दाखवून शेवट

करावा असा विचार निश्चित केला नी एका कागदावर कांहीं टिपणेंही भरभर लिहून काढलीं. पुस्तक मिटलं आणि स्वस्थ विचार करीत टेबलावर दोन्ही पाय पसरून खुर्चीवर बसून राहिलों. त्या तशा स्थितींत मी आणखी कितीवेळ बसून राहिलों असतों कोण जाणें पण माझी ती समाधी भंग पावली. माझी तंद्री उतरली. झोपेंतून जागा झालेल्या मनुष्याप्रमाणें मी भानावर येऊन दरवाजाकडे दृष्टी फेंकली. दरवाजांत शशिकला उभी होती. दवाखान्यांतून औषध घेऊन परत घरीं जात असतांना ती पुन्हा आली होती. तिला कांहीं तरी सांगायचं आहे हें तिच्या चर्येवर उठणाऱ्या भावतरंगावरून कुणीही सहज ओळखलं असतं ! तिला काय सांगायचं हें मला कालच कळलं असल्यामुळें आतां तिला जास्त छेडण्यांत शहाणपणा नाहीं असा विचार करून मीच प्रथम बोलण्यास सुरवात केली............

" शशी—झालंय् काय तुला ? तूं आज अशी खिन्न कां दिसत आहेस ? "—मी म्हणालों.

—माझ्या या प्रश्नावर तिच्याकडून मला उत्तर मिळालं नाहीं. तिला उमाळा दाटून आला नी हळूंहळूं ती हुंदके देऊन रडूं लागली. तिला रडतांना पाहून मला कळवळा आला. मी चटकन् उठलों नी तिचे दोन्ही हात हातांत घेऊन तिला दरवाजांतून आंत घेतलें. तिचे हात तसेच हातांत ठेवले नी मी तेथल्या टेबलावर खालीं पाय सोडून बसलों. माझ्या समोरच ती खालीं मान घालून

रडत उभी होती. "शशी, मला सारं कांहीं समजलं आहे. पण उपाय आहे कां कांहीं यावर ? कोणत्या तोंडानें आपण आपल्या प्रेमाचा स्फोट करायचा? बरं, तसं केल्यानें आपल्याला नक्की यश येईलच हें तरी कुणी सांगावं? कदाचित् बाजू उलट-ण्याचाही संभव जास्त.....पुरें कर रडणं शशी...."—मी

ती कांहींच बोलत नव्हती. थोडया वेळानें तिनें आपले हात सोडवून घेतले—डोळे पुसले—तोंड पदरानें पुसून स्वच्छ केलं नी मुकाट्यानेंच आली तशी परत गेली.

# प्रकरण ७ वें–आश्वासन

## शशिकलेनें लिहीलेली हकीकत

माझ्या लग्नाच्या खटपटींत अलीकडे दादा अगदीं गुंग झाले होते. वरचेवर रजा काढीत अन् वाशीला एक स्थळ आहे तिकडे हेलपाटे घालीत. जितक्या निकडीनें त्यांची खटपट चालू होई तितक्या जास्त प्रमाणांत माझ्या अंतःकरणाला टोंचणी लागून राही. ते गांवीं गेले, कीं वाटूं लागायचं माझ्या मनाला–'कशाला गेले दादा तिकडे?– माझ्या अंतःकरणाच्या खांडोळ्या होत आहेत हें त्यांना काय माहीत? चंद्रकांतावर मी निःसीम प्रेम करते हें मी कसं सांगूं दादांना?....' आणि अशा तऱ्हेचे विचार उद्भवत अन् मन भाम्बावून जाई. अयशस्वी होऊन दादा परत येतील तर बरं असं वाटत असे अन् खरोखरच ते तसे अयशस्वी होऊन परत आले म्हणजे अंतःकरणावरचा मोठा थोरला भार उतरला असं वाटून थोडंसं हायसं वाटे! आजचीच गोष्ट–दादांनीं आज रजा काढली होती. सबंध दिवस ते घरींच होते. रात्रीं नवाच्या गाडीनें ते गांवाला जाणार होते. आणि ही हकीकत मला कालच सायंकाळीं दादा ज्यावेळीं ऑफिसमधून आले होते त्यावेळीं कळली होती. कालपासून माझं चित्त ठिकाणावर नव्हतं. कोणत्याच कामाकडे माझं लक्ष नव्हतं. क्षणाक्षणाला माझ्या काळजाचे कोणीतरी लचके तोडून घेत आहेत कीं काय, असा मला भास होई.

दृष्टींत भेदरटपणा दाटला आहे असं वाटूं लागे. मन भांबावून जाई, ऊर धडधडूं लागे—कांहींतरी अपूर्ण आहे असं वाटून त्या अपूर्ततेची तीव्र जाणीव होत असे माझ्या मनाला! माझी ही मनःस्थिति चंद्रकांतांच्याजवळ खुली करावी असं नेहमी मला वाटे, पण प्रत्यक्ष चंद्रकांत समोर आले म्हणजे माझं धैर्य खचत असे. मला माझी स्वतःचीच भीति वाटत असे. पण याचवेळीं ते सतत समोर असावेत—एक क्षणही ते माझ्यापासून दूर जाऊं नयेत असं वाटायला लागायचं. त्यांनीं अगदीं माझ्याजवळ बसावं; माझ्याशीं सारखं बोलत राहावं असं वाटून मन उद्विग्न होत असे. दिवसाच्या चोवीस तासांतून जे कांहीं थोडे क्षण त्यांचे सहवासांत जात तेच मला जगाला विसरवायला लावीत. त्यांच्याशीं बोलतांना आजूबाजूच्या जगालाच काय; पण मी स्वतःलासुद्धां विसरत असे. इतकी मी तल्लीन होई आणि त्याच तल्लीनतेंत अंतःकरणाला गुदगुल्या होत असल्याचा भास होऊन ते क्षण कायमचे लाभतील तर बरं असं अंतःकरणपूर्वक वाटूं लागे.

परवांची गोष्ट.—नेहमीं प्रमाणें मी चंद्रकांतांच्या घरीं गेले होते. त्यांच्या घरांत त्यांच्याशिवाय कुणींच नव्हतं. ते आपल्या खोलींत कांहींतरी लिहीत होते. मी तडक वर त्यांच्या खोलींत गेले. ते लिहीण्यांत अगदीं गर्क झाले होते. इतके कीं, मी त्यांच्या मागें खुर्चीवर हात ठेवून उभी असल्याचं कळलं सुद्धां नाहीं. ते भरभर लिहीत होते.

माझ्या मनाला एक प्रकारचा अननुभूत, पण अवर्णनीय आनंद होत होता. मी उत्फुल्ल नजरेनीं त्यांच्या लिखाणाकडे पाहात होतें. सांपत्तिक दृष्टीनं चंद्रकांत गरीब होते. पण त्यांच्या लिखाणाकडे पाहून मी त्यांची गरीबी विसरत असें. गरीब प्रियकर निवडला म्हणून कदाचित् कोणी मला दोष देतील, पण माझ्या दृष्टीला तो दोष आहे असं मला वाटत नाहीं. फूल बागेंतल्याच झाडाला येतं आणि माळा-वरच झाडाला येत नाहीं असं थोडंच आहे. प्रीतीचंही तसंच नाहीं कां ? गरीब आणि श्रीमंत हा भेद प्रेमाला दिसत नाहीं. माझा प्रियकर लेखक आहे याच अभिमानानें माझं शरीर रोमांचित होई आणि दृष्टींत एक तऱ्हेचं नवतेज चमकूं लागे. परवां कांहीं दिवसां-पूर्वीं त्यांचीं एक नाटिका प्रसिद्ध झाली होती ती मी पाहायला गेले होते. आणि ती पाहात असतांना माझ्या अंत:करणाला एक सारख्या उकळ्या फुटत होत्या. स्त्रियांच्या उद्धारासाठीं लिहीलेली ती नाटिका होती. पात्रांच्या तोंडीं भाषणरूपानें त्यांच्या लेखणींतून उतरलेलें तें तेजस्वी लिखाण—तें ऐकत असतांना मला काय वाटलं तें माझं मला माहीत. सांगून कुणाला कळणार नाहीं, आणि सांगतां येण्यासारखंही पण नाहीं तें !

यावेळीं त्यांनीं "देव कीं दगड ?" ही कादंबरी लिहीण्यास घेतली होती. चार प्रकरणं लिहून झालीं होतीं. पांचवं प्रकरण लिहीत होते. मी अगदीं मंत्र मुग्धतेनें त्यांच्या लिहीलेल्या कागदाकडे पाहात होतें.

त्यांनीं प्रकरण पुरें केलं, टांक खालीं ठेवला, टीपकागदानें तें टिपलं आणि टेबलाचा डावर उघडून त्यांत तीं सारीं कागदं कोंबलीं आणि आळस देण्यासाठीं त्यांनीं दोन्ही हात वर उचलून हातांना मिठी घातली.

मी मागेंच खुर्चीच्या पाठीवर हात ठेवून थोडीशी रेलून उभी होतें. त्यांच्या कृतीकडे मी निश्चल नजरेनीं टक लावून पाहात होतें. आळस देण्यासाठीं हात उचलले आहेत हें मला त्या तल्लीनतेंत कळलं नाहीं आणि नेमके त्यांचे हात माझ्या गळ्याभोवतीं पडले; आणि मिठी बसली त्यांच्या हातांची. माझ्या गळ्याला स्पर्श झाल्याबरोबर माझ्या नेत्रांतली धुंदी उतरली आणि मी भानावर आलें. माझ्या गळ्याचा स्पर्श झाल्याबरोबर तेही चमकले, आणि चमकूनच त्यांनीं वर पाहिलं. दोघांनींही एकाचवेळीं एकमेकांकडे पाहिलं. दृष्टीला दृष्टी मिळाली. अंत:करणाला ओळख पटली. त्यांनीं हात मात्र माझ्या गळ्याभोंवतींचे काढले नाहींत. त्यांनीं तसंच मला खालीं ओढलं, आणि —आणि—

**“ जीवीच्या सुमनांत हें उडतसे–प्रीती परागान्वित—**
**हौसेनें फुलपाखरूं चिमुकलें, गुल्जार अन् चंचल.**
**तत्प्रीत्या अति गुंगलें मन असें पाहूनिया तेधवां—**
**गेलें दूर उडून तें न कळलें कोठें, कसें, केधवां ? ॥”**

   

माझ्या सर्वांगावर त्या अकल्पित आणि अचानक घडून आलेल्या

प्रसंगामुळें काटा उभा राहिला. गालाला झालेल्या मृदु स्पर्शानें अंतःकरणांत हळुवार झटके बसले. गोड–सुखद भावना तरंगूं लागल्या. पुन्हा एकदां तसलाच स्पर्श, पण दुसऱ्या गालावर व्हावा असं मनाला वाटलं; मन उतावीळ झालं; पण—पण—

**" आशा मोहित ह्या मनास भुलवी, हर्षामध्यें डुंबवी–**
**हा हा, ना कळली तयास करणी ही निष्ठुरा राक्षसी "**

त्यांनीं चटकन् दुसऱ्याच क्षणीं आपल्या हातांची मिठी सोडवली आणि हात खालीं घेतले. त्यांच्या चेहऱ्यावर खिन्नता प्रकट झाल्याचें मला स्पष्ट दिसून आलें!

" ....शशी, मी चुकतो आहे. तूं श्रीमंत आहेस, गुणानेंही माझ्यापेक्षां सरस आहेस. मी गरिबानें तुझा हव्यास धरणं म्हणजे मूर्खपणा नाहीं कां? माझ्यापेक्षां जास्त योग्यतेचे, गुणानें, रुपानें, स्वभावानें, स्थितिनें जास्त सरस असलेले तरुण जगांत काय कमी आहेत? तुला काय सुख लागणार माझ्यापासून? "

त्यांच्या या उद्गारानेंच माझं हृदय भरून आलं. त्यांच्यावर असलेलं माझं प्रेम दुपटीनं वाढलं. मी त्यांच्याकडे अभिमानानें पाहूं लागलें.

" चंद्रकांत तुम्ही गरीब असलांत तरी माझ्या दृष्टीला गरीब नाहींत–उगीच मनाला खाऊन घेऊं नका. भलभलते विचार मनात आणून उगीच मनाला शीण देतां झालं! माझ्या मनाची पारख नीटशी झालेली दिसत नाहीं अजून तुम्हाला? चंद्रकांत, तुमचा

प्रेमळ स्वभाव, गोड बोलण्याची पद्धत, दुःखी असतांनाही हंसून खेळून वागणं, कोणत्याही विषयाकडे चिकित्सक दृष्टीनं पाहणं, स्वतःचं कसलंही काम दुसऱ्याकडून सहजासहजीं करून घेण्याचं कौशल्य–आणि असे कितीतरी गुण तुमच्याअंगीं आहेत कीं, त्यांचीच मोहिनी माझ्या मनावर पडली आहे. चंद्रकांत–निष्कारण मनाला त्रास कां करून घेतां? वास्तवीक मीच अयोग्य आहे तुम्हाला. तुमच्यासारखं रत्न लाभलं मला, हेंच मी भाग्य समजतें. शोधूं जातां सापडणार नाहीं असं अमोल रत्न मला सापडलं. किती धन्यता वाटते माझ्या मनाला! माझे वडील श्रीमंत आहेत म्हणून मी श्रेष्ठ आहें असं तुम्हाला वाटतं कां? पण तुमची ही समजूत चुकीची आहे. मी तुम्हांपेक्षां जास्त श्रेष्ठ खास नाहीं. चंद्रकांत स्नेहार्द्र दृष्टीनं एकदां पाहाना माझ्याकडे? असं काय बरं करायचं गडे?"
दोन्ही हातांनीं त्यांनीं आपलं तोंड झांकून घेतलं होतं. तें पाहून माझ्या अंतःकरणाला पीळ पडत होता. माझा दुःखावेग वाढला. मला सहन होईना तें. मीं हलकेच एका हातानें त्यांचे हात काढले, आणि दुसऱ्या हातानें त्यांचं तोंड वर उचललं. त्यांचे नेत्र भरून आले होते. त्यांना कसलं तरी दुःख होत होतं. त्यांच्या दृष्टींत भावलोलुपता होती;—पण कारुण्यपूर्ण चेहऱ्यामुळें ती दडलेली स्पष्ट दिसत होती.

"शशी, वेडे, किती मनधरणी करणार तूं माझी? तुला वाटत असेल, पण ती धुंदी आहे. मी तुझ्या योग्यतेचा खात्रीनें नाहीं. निष्कारण माझ्या नादीं लागूं नकोस. जा, मला विसरून जा तूं!"

असें म्हणून पुन्हां त्यांनीं आपलं तोंड हाताच्या ओंजळींत दडवलं आणि हुंदके देऊं लागले.

"चंद्र, माझ्या अंतःकरणाला घर पाडतां आहात तुम्ही! किती खांडोळ्या करणार माझ्या हृदयाच्या—सहृदय ना तुम्ही? मग तुमची ही सहृदयता कुठं लोपली आतां? माझ्या मनाला किती दुःख होत आहे, कशातऱ्हेच्या वेदना होत आहेत हें तुम्हाला कसं कळणार?—" मलाही हुंदका आवरेना!

"होय! तें मला कळतं आहे. तुझ्या अंतःकरणाला होत असलेल्या वेदना मला जाणवतात आणि त्यामुळें माझंही अंतःकरण विदारून जातं. पण सध्यांचा काळ आपल्या मीलनाला अनुकूल नाहीं, शशी! सध्यांच्या संक्रमण स्थितीचे बळी आहोंत आपण शशी! समाजांतील आर्थिक विषमता जोंपर्यंत नष्ट होणार नाहीं तोंपर्यंत आपल्यासारखेच कितीतरी अभागी जीव बळी पडतील. आपण आपल्या मनाचे पूर्ण मुखत्यार असलों तरी मनाला पायबंद घालणाऱ्या परिस्थितीचे मुखत्यार खास नाहींत! तुला आणि मला जें वाटतं आहे तें प्रत्यक्ष कृतींत उतरणं फार दुर्घट आहे शशी! मी फार गरीब आहे. गरीबाशीं संसार थाटावा असं तुला वाटत असलं तरी तुझ्या घरच्या माणसांची दृष्टी निराळी आहे. विवाहांत प्रेम आणि इतर उच्चतम भावनांची अपेक्षा तरूण-तरुणी करतात; मोठेपणामुळें समजूत आलेली असते. ज्ञानानं आपली स्थिती कळून येते. आर्थिक परिस्थिती, कौटुंबिक गरजा, सामाजिक बंधन आणि दर्जा वगैरे वगैरे

अनेक भानगडींमुळें आपण जी अपेक्षा करतों ती पुढें फोल ठरते. आतां दिसणारीं विचारांचीं हीं कोवळीं हिरवीं पानंच पुढं परिस्थितीच्या उष्णतेनं भाजून करपून काळी ठिक्कर पडतील. म्हणून म्हणतों—ती अपेक्षा आपण न केलेलीच बरी. माझ्याशीं विवाहबद्ध व्हावं—संसार करावा—असं तुला वाटतं; पण आपला संसार सुखानेंच काय, पण पुरेशा समाधानीवृत्तीनेंही पार पडेल ही आशा नाहीं मला. पदोपदीं दारिद्र्याचे चटके अंत:करणाला भाजून काढतील, जीव त्रस्त होईल अन् मग ह्या खाईंत कशाला पडलो असं वाटायला लागेल. शशी, कां उगीच माझा हव्यास धरतेस ? " चंद्रकांत म्हणाले.

"मला कळत कां नाहीं तें चंद्रकांत ? तुमचं म्हणणं खरं आहे, आणि मला पटतंही अगदीं; पण पण—आहे त्याला ! एकाद्यानें दगडांत देव नाहीं असं परोपरीनं सांगितलं तर पटतं कित्येकांना तें ! पण पटलं तरी भावना उडून जात नाहीं त्याची. त्या दगडांतच त्यांची भावना दडलेली असते आणि म्हणून तिथं देव आहेच असं त्यांना वाटत असतं. तीच गत माझ्या मनाची झाली आहे. तुम्ही सांगतां आहांत तें अगदीं पटतं आहे माझ्या मनाला. आर्थिक परिस्थितीचीं भविष्यकाळांतलीं भेसूर चित्रं तुमच्या मनाला जितकीं भेडसावतात, तितकींच माझ्या मनालाही तीं भेडसावतात. त्याच्यानं मी भांबावून जातें. पण तुमच्या ठिकाणीं माझं मन इतकं एकरूप झालं आहे, इतकं समरस पावलं आहे कीं, तुमच्यावरील असलेल्या प्रेमामुळें तुमचं म्हणणं पटत असलं तरी माघार घेववत

नाहीं मला ! आणि म्हणूनच तुमच्याशीं समरसतेनं आयुष्य घालविण्याचं ठरवलं आहे मी ! पण तुम्ही माझ्या प्रेमाचा अव्हेर करीत आहांत—ठिकऱ्या उडवीत आहांत तुम्ही माझ्या अंतःकरणाच्या.”
मला हुंदका आवरेना. मी हळूहळू रडूं लागलें. माझे हात त्यांनीं आपल्या हातांत घेतले.

“तुझ्या प्रेमाचा अव्हेर ? आणि माझ्याकडून होईल ? कसं शक्य आहे हें शशी ? माझ्या आयुष्यांत परिस्थितीचें कोलाहल कालविलं गेलं आहे. त्यांत तुझ्या प्रेमामृताचा एकच बिन्दू मला क्षणभर कां होईना—तल्लीन करून सोडील. कोलाहलाची विस्मृति पाडील. अशा स्थितींत मी तुझ्या प्रेमाचा अव्हेर कसा करीन शशी ? तुझ्यावरील प्रेमामुळंच सहजीवनाचं सुख अनुभवावं असं तुझ्याप्रमाणंच मलाही वाटतं. पण म्हणून माझ्याबरोबर तुलाही दुःखसागरांत लोटून घ्यावं हें रुचत नाहीं माझ्या मनाला. मात्र आजन्मांत मी तुला विसरणं शक्य नाहीं एवढं मी अश्वासन देतों आज.”

# प्रकरण ८ वें—स्फोट

**चंद्रकांतानें लिहिलेली हकीकत:—**

शक्य नाहीं झोंप येणं! सारखा विचार करतो आहे मी ! विचार करून करून मेंदूला थकवा आला, जीव त्रस्त झाला. अंत:करणांत कशी काहिली होते आहे सारखी.

आर्थिक विषमतेसंबंधीं मी ज्या ज्या वेळीं विचार करतो, त्या त्या वेळीं माझ्या शरीरावर भीतियुक्त रोमाञ्च उभे राहतात. अन् चिमटे घेतल्याप्रमाणें अंत:करणाला वेदना होतात. कांहीं क्षण भांबावल्या सारखं होतं मला त्यावेळीं. वाटतं कशाला हें जीवन जगवायचं ? आहे काय या आयुष्यांत ? आयुष्याच्या या लढ्यांत—कांहीं तरी उलाढाल करायची—इकडलं तिकडं, तिकडलं इकडं करून—कुणीकडून तरी जीवन कलहाचा प्रश्न मिटवायचा—याशिवाय दुसरं आहे तरी काय ?—

मला आठवतं आहे—कुणीसं म्हटलं आहे कीं,—

"Life without love and riches is dry and so it is worthless."

आयुष्यांत प्रीति अन् श्रीमंती यांशिवाय खरी मजा नाहीं—आणि अगदीं खरं आहे तें !

मी....?—तसं म्हटलं तर हतभागी आहे. मला प्रीतीची प्राप्यता लाभली होती, पण आतां—! ! !

पैशाअभावीं—आर्थिक विषयतेमुळें—मला कांहीं कालापूर्वीं प्राप्त

झालेल्या त्या प्रीतीची प्राप्यता माझ्या पुढील आयुष्यांत लाभेल अन् त्यापासून माझं भावी जीवन सुखकर होईल ही खात्री नाहीं आतां मला.—

शशिकलेचे वडील मागें लांबणीवर पडलेलं काम झटपट उरकून घेण्यासाठीं पुन्हा गांवाला गेले होते. या खेपेस मात्र ते 'होय, नाहीं' हें नक्की करूनच—पण बहूतकरून यशस्वी होऊनच परत येतील अशी खात्री असल्यामुळें अलीकडे मला चैन पडत नसे! जरी त्या ठिकाणचें फिसकटलें, तरी तिचे वडील यापुढें स्वस्थ बसणार नाहींत. कांहीं झालं, तरी या वर्षीं पोरीला 'उजवायचीच' असा त्यांनीं निश्चय केला असल्यामुळें आज नाहीं उद्यां शशिकला आपल्याला अंतरणार हें नक्कीच! तिच्या विषयीं माझ्या अंतःकरणांत ममत्वाची भावना रुजली होती........मी तिच्याकडे माझ्या भावी आयुष्यांतील—संसारातील सोबतीण—माझ्या भाग्याची भागीदारीण वगैरे नात्यानें पाहात होतों. आतां त्या साऱ्या भावनांचा मला चुराडा करणंच भाग आहे.

याच एका विचारानें मला दोन तीन दिवस रात्रीं झोंप सुद्धां आली नाहीं. रोज रात्रीं शरीर गादीवर असायचं, पण मन मात्र भावी आयुष्यांतलीं भेसूर स्वप्नें पाहून सारखं तळमळायचं. डोळे झांकून गादीवर पडलं, तरी झोंप मात्र येत नसे. भवितव्यतेचीं भुतें कल्पनाचक्षूंसमोर नाचूं लागत अन् त्यायोगानें मन अस्वस्थ होई.—अखेरीस पहाट झाली म्हणजे कंटाळून उठायचं अन् लांब

कुठं तरी दूर गांवाबाहेर फिरायला जायचं असा माझा दोन तीन दिवसाचा क्रम होता.

मी दुपारच्यावेळीं शशिकलेच्या घरीं गेलों—सुदैवानें तिच्याशिवाय घरीं दुसरं कोणी नव्हतं—शशिकला माझ्याकडून नेलेली 'रत्नगडची रंभा' कादम्बरी वाचीत होती. मी आलों आहे हें कळल्यानंतर तिनं पुस्तक मिटलें.

आम्ही कितीतरी वेळ बोलत होतों. अखेरीस शशिकलेनीं आणि मी—दोघांनींही—कांहींतरीकरून या गोष्टी उघडकीला आणा-यच्या—प्रेमाचा स्फोट करायचा आणि जमत असलेलं दुसरीकडील लग्न मोडून शक्य झाल्यास प्रेमाचा दिग्विजय करायचा—तेवढ्यासाठीं धडपडायचं—खटपट करायची असं ठरवलं.

पण चर्चा करणं, बोलणं सोपं असलं, तरी तो विचार प्रत्यक्ष कृतींत उतरविणं फार दुर्घट असतं—आम्ही जरी विचार निश्चित केला तरी आम्हाला मार्ग सांपडेना! प्रत्यक्ष स्वतः तिच्या आईवडिलांना सांगायला मी केव्हांही तयार नव्हतों आणि तिला तर तें शक्यच नव्हतें. आधीच परिस्थितीनें मी गरीब,—तशांत त्यांच्या घराचा नी आमच्या घराचा खाजगी बाबतींत नेहमीं नेहमीं खटका उडत अस-ल्यामुळें—मी शशिकलेवर प्रेम करतो आहे—असं सांगायचं तरी कोणत्या तोंडानें! आणि जरी यदाकदाचित् धैर्य करून मी या गोष्टी तिच्या आईवडिलांना सांगण्याचा प्रयत्न केला—तर त्यांच्याकडून काय काय मुक्ताफळं ऐकायला मिळतील हें उघडच असल्यामुळें एकवेळ प्रेमभंग

झालेला फक्त, पण ती मानहानी नको या विचारांनीं मी माघार घेऊं लागलों.

पण शशिकलेचा आत्मविश्वास जबर—काय वाटेल तें झालं तरी ही गोष्ट मी आई—दादांच्या कानावर घालून सोक्षमोक्ष करून घेणारच असं तिनं निश्चित ठरविलं.

मी मात्र मनांतून साशंकच होतों. त्या दिवशीं रात्रीं मला झोंप आली नाहीं. माझ्या मनांत विचार घोळत होते. एकाद्या रंगकाम करणाऱ्या रंगाऱ्याच्या दुकानीं ठिकठिकाणीं निरनिराळ्या रंगाचे डबे पडलेले असतात त्याप्रमाणें माझ्या मनांत जागोजाग निरनिराळे विचार इतस्ततः पसरलेले होते. शशिकलेचा प्रयत्न यशस्वी झाला, तिच्या आईवडिलांना ही गोष्ट कळली तर त्याचा परिणाम काय होईल वगैरे विचारांनीं माझं मस्तक सुन्न झालं.

  

मोठ्या युक्तीनें प्रेमाचा स्फोट शशिकलेनीं केला. त्याचं असं झालं. :—

त्यांचे शेजारीं एक विवाहित पण अत्यंत व्यवहारदक्ष तरुण रहात असे. तो तरुण कुठल्याशा ऑफिसमध्यें क्लार्कच्या नोकरीवर होता. फार प्रेमळ, सहृदय अन् थट्टेखोर स्वभावाचा माणूस!

मी अन् शशिकला कॅरम खेळतों—फिरायला जातों—सिनेमाला जातों. हें त्यानें पाहिलं होतं अन् केव्हां केव्हां तो माझी—तसेंच शशिकलेचीही कांहींतरी विचित्र थट्टा करीत असे.

याच तरुणाचा सल्ला घ्यावा; त्याला सर्व गोष्टी मनमोकळेपणीं सांगाव्यात अन् तो सांगेल तसा पुढील वर्तणुकींत फेरबदल करावा असा मी विचार केला होता, पण माझा हा विचार प्रत्यक्ष अमलांत येण्यापूर्वींच शशिकलेनें त्यांना सर्व गोष्टी पत्ररूपानें कळवून आपला मनोदय स्पष्टरूपानें कळविला!

त्यांनीं तें पत्र वाचतांच मला बोलावून घेतलें. अन् तें पत्र दाखवून—"हें खरें आहे कां?" असं विचारलें. तें पत्र पाहतांच मी आश्चर्यानें स्तम्भितच झालों. शशिकलेच्या अंगीं इतकं धैर्य असेल याची आजच प्रथम जाणीव झाली माझ्या मनाला अन् कांहींसं कौतुक सुद्धां वाटलं मला तिचं. कांहीं क्षण मी नुसता त्या पत्राकडे दिग्मूढपणें पहात उभा राहिलों.

त्यांनीं—प्रभाकर त्या तरुणाचं नांव—मला पुन्हा विचारलें अन् नंतर मी मान हलवून—मानेनेंच "हो" कार दर्शविला.

—"चंद्रकांत तूं गरीब आहेस! शशिकला फार श्रीमंताची मुलगी नसली, तरी तुझ्यापेक्षां त्यांची सांपत्तिक स्थिति केव्हांही उत्तमच आहे. तुझ्यासारख्या होतकरू तरुणानें, नवोदित लेखकानें या अशा फंदांत पडणं बरं आहे का? याचा तूं कांहीं विचार केला होतास का? शक्याशक्यतेबद्दल कधीं कल्पनेला ताण दिला होतास का? अजून नीट विचार कर. अन् विचार निश्चित झाल्यावर मला कळव. मात्र तोंपर्यंत तूं तिची भेट घेतां कामा नये."

मी मुकाट्यानें मान तुकवली. काय करतों न तुकवून? आणि

त्यांनीं तरी असं काय वाईट सांगितलं होतं आपल्याला?

"जा आतां;—चार दिवसांनीं ये. तोंपर्यंत तूं आपला विचार निश्चित् कर. यापेक्षां जास्त मुदत तुला मिळणार नाहीं. जा." ते म्हणाले.

मी निघून आलों.

आतां मात्र मी चुकलों, याबद्दल माझ्या मनाची पूर्ण खात्री झाली.........मी गरीबानें त्या श्रीमंताच्या मुलीचा हव्यास धरणं इष्ट आहे का? याबद्दल माझ्या मनाला टोंचणी लागली.....श्रीमंत आणि गरीब....!!!....?

आर्थिक विषमतेचें भूत माझ्यासमोर नाचूं लागलें.

आर्थिक विषमता—???

# प्रकरण ९ वें–स्थितीचा इंदू

तीन दिवस झाले, मी सारखा विचार करतो आहे. विचार करून करून मस्तक बधीर झालं.

आपण केलं काय; कोणत्या हेतूनें शशिकलेचा अभिलाष धरला; त्याचा परिणाम काय झाला? काय हे; भलतंच करून बसलों.

प्रभाकरपंतांनीं पुन्हा बोलावलं होतं म्हणून मी त्यांच्या घरीं गेलों होतों. त्यांनीं मला पहिला प्रश्न विचारला—"शक्याशक्यतेचा विचार केला होतास का तूं?"

"कसा करणार सर? विचार करण्या इतक्या भावना बंधनांतून सुटलेल्या असतात का? तारुण्यावस्थेंत साऱ्या भावना प्रीतीच्या सभोंवार केन्द्रीभूत होतात, अशा वेळीं इतरत्र वस्तू दृष्टीच्या टप्प्याआड होतात—त्यांचं अस्तित्व मनाला पटत नाहीं.—आणि ह्मणूनच या अवस्थेला—आंधळी प्रीती—असं म्हणतात." मी उत्तरलों.

"तुझं तें तत्वज्ञान मला नको आहे. झालं तेवढं फार झालं—यापुढें काय विचार केला आहेस तूं!"

"काय विचार करणार मी? प्रेमाचा विजय होईल आमच्या बाबतींत हें निश्चित दिसत नाहीं. आणि म्हणूनच जें कधींकाळीं घडणार नाहीं त्याचा आतां यापुढें हव्यास धरायचा नाहीं असं मी ठरविलं आहे." मी खालीं मान घालून म्हणालों.

"हें जमणार नाहीं असं तुला वाटतं ना?" त्यांनीं मला प्रश्न विचारला.

"होय, मला तसं नक्की वाटतं आहे."

"मग हा विचार तूं आधीं नको होतास करायला? कोण-त्याही गोष्टीचा शक्याशक्यतेचा विचार केल्याविना हव्यास धरणं मूर्खपणाचं नाहीं कां? तुझ्या या अविचारी वर्तुणुकीमुळें, नकळतपणें तूं स्वतः दुसऱ्या एका जीवाचा बळी घेत आहेस हें तुला अद्याप कसं कळत नाहीं?" त्यांचा स्वर रुष्ट झाला.

"तें कसं काय?" मी म्हणालों.

"कसं काय? एका जीवाला प्रीतीच्या पाशांत बद्ध करून ठेवलंस, आणि आतां जमत नाहीं म्हणून त्याचा हव्यास सोडून देतोस? बरं वाटतं का हें तुला?" त्यांनींच उलटा प्रश्न विचारला.

"कशावरून म्हणतां तुम्ही मी हव्यास सोडला आहे असं?" मी प्रश्न विचारला.

"तूं म्हणालास कीं मघाशीं!"

"मी तसं म्हणालों नाहीं; तर—माझ्या म्हणण्याचा हेतू हा कीं, आधीं स्थिति सुधारीन आणि मग तिच्याविषयीं खटपट करीन. मला नक्की समजून चुकलं आहे कीं स्थितीचा इन्दू उगवल्याशिवाय सुखाच्या सिन्धूला भरती येणार नाहीं." मी असं म्हणालों अन् तडक निघून आलों. तिथं जास्त वेळ बसावं असं वाटेना मला.

# प्रकरण १० वें–निश्चय

**शशिकलेनें लिहिलेली हकीकतः—**

" प्रिय शशिकला—

" मी तुला विसरणं शक्य नाहीं " असं आश्वासन मी तुला दिलें हें खरं; पण अंतःकरणांत केवळ नुसती स्मृति जागृत राहणं म्हणजेच प्रेमाची साफल्यता आणि इतिकर्तव्यता झाली असं समजायचं कां ? कोणतीही आणि कसलीही बिकट परिस्थिति निर्माण होवो, माझ्या अंतःकरणांतून तुझ्या मूर्तीचा नाश होईल, मी तुला विसरेन असं कदापिंही घडून येणं शक्य नाहीं. अगदीं अशक्य कोटींतीलच आहे ही गोष्ट !

प्रेमसुखाचा लाभ माझ्या आयुष्यांत अखेरपर्यंत मला मिळेल हें शक्य वाटत नाहीं मला. आज नाहीं उद्यां तुझं लग्न होणार हें नक्की; आणि तेंही दुसऱ्याशीं–माझ्याशीं नव्हें हेंही तितकेंच नक्की ! ज्या तुझ्या गुलाबाच्या पूर्णोन्मीलित फुलाशीं स्पर्धा करूं पाहणाऱ्या गुलाबी अन् लुसलुशीत ओठांवर ओंठ ठेवायला, दृष्टीशीं दृष्टी भिडवायला मला आजपर्यंत कधींच दिक्कत वाटली नाहीं, त्या तुझ्या तोंडाकडे यापुढें नुसत्या भरल्या नजरेनीं पाहणं म्हणजे परस्त्री अभिलाषाचा गुन्हाच ठरणार ! नव्हे कां ? तुझ्याकडे मला पाहवणारच नाहीं हें खरं–कारण, तूं माझी नाहींस, तुझ्या कपाळावरील कुंकू माझ्यासाठीं लावलें

गेलें नसून दुसऱ्यासाठीं लावलें गेलें आहे, अर्थात् माझ्या अंतःकर-णावर सुरीचे घाव घालून त्यापासून निघालेल्या रक्ताचाच तो कपाळावरील लाल डाग आहे या दुहेरी जाणीवेमुळें माझ्यानें तुझ्या चेहऱ्याकडे पाहवणार नाहीं—तूं अगदीं जवळून गेलीस तरी तुझ्या चेहऱ्याकडे पाहण्याचा धीर मला होणार नाहीं—मग या बाबत माझ्या या मनःप्रवृत्तीला 'स्वार्थीमनःप्रवृत्ती' अशी संज्ञा दे हवी तर तूं!

नुसत्या कल्पनेसरशीं माझ्या अंतःकरणाला तीव्र—असह्य वेदना होतात, मग प्रत्यक्ष स्थितीचा अनुभव घेतेवेळीं किती वाईट वाटेल, किती दुःख होईल हें काय सांगायला का हवं?

लग्नानंतरचें प्रेम म्हणजे चुन्यावरील निवळी! अंग भाजलें म्हणजे चुन्यावरील निवळी लावतात म्हणे; तद्वत् माझ्या भाजल्या जाणाऱ्या हृदयाला हें तुझं आतांच प्रेम तुझ्या लग्नानंतर निदान चुन्यावरील निवळीसारखं तरी उपयोगी पडेल का?—???—

आशा! आशा!! आशा!!!—ही आशा फार वेडी आणि वाईट आहे.—भाजल्या अंगावर चुन्यावरील निवळी लावली म्हणजे आग थांबते आणि कांहींवेळ थंडगार वाटूं लागतं—पण तुझ्या लग्नानें भाजल्या जाणाऱ्या माझ्या हृदयाची आग लग्नानंतरच्या तुझ्या प्रीतीनें चुन्यावरील निवळीसारखी उपयुक्त न ठरतां, कदाचित् मारकच होण्याचा जास्त संभव आहे.

शशिकला! शशिकला!! शशिकला!!!

हो, माझीच आहेस तूं! माझ्या प्रीतीची प्यार, जिवाची जीवलग,

भाग्याची भागीदारीण, मनाची मैना, संसाराची सोबतीण—छे, नव्हे! काय भलतंच लिहीलं मी! माझ्या संसाराची तूं सोबतीण नव्हेस! माझ्या प्रीतीची प्यार झालीस, मनाची मैना झालीस आणि मनाच्या मैदानांत स्वच्छंद विहरूं लागलीस तरी तूं माझ्या संसाराची सोबतीण होशील हें शक्य वाटत नाहीं मला.

शशिकले, तुझ्यावर प्रेम करून फसलों. तूं श्रीमंताची पोर आहेस! तुझ्या वाढल्या गरजा माझ्या सारख्या गरिबानें—कफल्लकानें कशा पुरवावयाच्या? जन्मल्यापासून तों तहत या क्षणापर्यंत तूं अगदीं पूर्ण सुखांत—वाढत्या वैभवांत आणि आईबापांच्या लाडांत वाढलेली आहेस. कधींच तुझी इच्छा अपुरी राहिली नसेल, त्या तुला माझ्या सारख्या हातावर पोट भरणाऱ्या दरिद्री वाङ्मयसेवकांपासून कसें सुख मिळूं शकणार? एखाद्या वस्तूविषयीं श्रीमंती थाटांत वाढलेल्या आणि चटावलेल्या तुझ्या मनाला अभिलाषा उत्पन्न झाली आणि माझ्या या अशा दारिद्र्यावस्थेंत—आर्थिक कमतरतेमुळें तुला ती अभिलाषित वस्तू घेतां नाहीं आली तर किती वाईट वाटेल? तुला आपलं मन मारतांना असह्य वेदना होतील, क्षणोक्षणीं पूर्ववैभवाची आठवण होईल, आणि त्या आठवणीमुळें तुझं अंतःकरण जास्तच विदारून जाईल. अशा स्थितींत मलाही सुख लागणं शक्य नाहीं, आणि तुला देखील सुखाच्या पायरीवर उभं राहणं अशक्य होईल.

'मी तुला विसरणें शक्य नाहीं' ही गोष्ट निर्विवाद सत्य आहे. पण म्हणून तुझ्यावरील प्रेमाच्या चिरकालित्वासाठीं मी लग्नाशिवाय

आमरणपर्यंत राहीन हेंही शक्य नाहीं. निदान जननिंदेसाठीं तरी मला लग्न करणेंच भाग आहे. तेव्हां, मी ज्या अनोळखी मुलीशीं लग्न करीन—आणि त्या मुलीला जेव्हां जेव्हां मला जवळ घेणं भाग होईल, तेव्हां तेव्हां मला तुझी आठवण तीव्रतेनें होईल आणि माझं अंत:करण विदारून जाईल. तुझा विसर पडणें शक्य नाहीं.

या साऱ्या दु:खाचें—असमाधानाचें एकच कारण—आर्थिक—विषमता!—विषमता! विषमता!! विषमता!!!

तुझे वडील श्रीमंत आणि मी गरीब! तुझे वडील खोऱ्यानें पैसे ओढणारे तर पैसे ओढण्यासाठीं हातीं खोऱ्या घेणारा मी—

या साऱ्या लिहीण्याचा उद्देश असा, कीं तुझ्यावरील प्रीतीच्या दृढतेमुळें तुझ्याशींच विवाहबद्ध व्हावं आणि जन्मभर प्रीतीचें मधुर अमृत प्राशन करावं असं वाटतं, तद्वतच माझ्या गरीबी परिस्थितीमुळें हें आज वाटणारं प्रीतीचं अमृत उद्यां कदाचित् जहाल हालाहालही ठरण्याचा संभव आहे. आपणां दोघांचाही जन्म समान स्थिति असलेल्या घराण्यांतच झाला असता तर मात्र आपली प्रीति आपल्याला अखेरपर्यंत अमृतापेक्षांही जास्त सुखास्वाद देऊं शकली असती हें नि:संशय. पण तें तसं नाहीं म्हणूनच तुझ्याशीं विवाहबद्ध न होतां तसंच राहावं असं वाटतं, पण हीही वृत्ती फार काल टिकून राहात नाहीं—दुसरीशीं कुणातरी मुलीबरोबर विवाह करावा तर तिच्या सहवासांत उलट दु:खच अधिक जाणवणार आणि क्षणोक्षणीं अंत:करण विदारून जाणार.

अशा या बिकट परिस्थितीच्या पेचांत मी सांपडलों आहे. तेव्हां माझ्या पत्राचा नीट सावकाशपणें विचार कर, आणि नंतर जर तुला माझ्या स्थितीशीं, माझ्या आयुष्याशीं पूर्ण समरस होतां येईल अशी खात्री वाटेल तर तसें मला कळव. म्हणजे त्याप्रमाणें पुढील सर्व धोरण निश्चित करतां येईल.

तुझा—(?)

**चंद्रकांत"**

किती तळमळीनें हें पत्र लिहीलं आहे चंद्रकांतानें! अंत:करण खुलं केलं अगदीं त्यांनीं. इतके दिवस सहवासाला असूनही माझ्या अंत:करणाची पारख कशी झाली नाहीं त्यांना असंही मला वाटलं. माझ्या प्रीतीच्या दृढतेची त्यांना शंका यावी यापेक्षां माझं दुर्भाग्य दुसरं तें कोणतं? त्यांच्या कसल्याही बिकट परिस्थितींत मला त्यांच्या इतक्याच प्रसन्नतेनें आल्या स्थितीशीं झुंजतां येणार नाहीं का? मला गरीबींत दिवस काढतां येणार नाहींत का? प्रीतीच्या सान्निध्यांत गरीबींतलं सुखसुद्धां स्वर्गसुखापेक्षां उच्च आहे.

पत्र वाचून झाल्यावर बराच वेळ विचार करीत होतें मी. अखेरीस माझ्या मनाचा निश्चय झाला नी चंद्रकांतांना भेटायला गेलें.——पण चंद्रकांत घरीं नव्हते.

नाइलाजानें मी घरीं परत आलें, तों दुसऱ्या डाकेनें चंद्रकांतांचें आणखी एक पत्र आल्याचें मला आढळून आलें—घाईघाईनें मी तें पत्र फोडलें आणि अधाशीपणानें वाचलें.

"प्रिय शशिकला—

एकाच दिवशीं एकामागोमाग एक अशीं हीं दोन पत्रें पाहून तुला मोठं चमत्कारिक वाटेल, नाहीं? पण तें तसं वाटूं देऊं नकोस! हल्लींच्या माझ्या विभ्रमामुळें चलबिचल झालेल्या मनःस्वास्थ्याचा विचार केल्यास यांत आश्चर्य वाटण्यासारखं किंवा चमत्कारिक वाटण्या-सारखं असं कांहीं नाहीं हें आढळून येईल.

कांहींही झालं तरी तुझ्याशींच विवाहबद्ध व्हावं असं फार फार वाटतं आहे, पण परिस्थितीचा पायबंद मनाची ही आकांक्षा पुरी करूं देईल असं वाटत नाहीं. तेव्हां यापुढें मला तुझ्या प्रीतीचा आस्वाद घेतां येणार नाहीं; नव्हे, मी तो न घेणेंच इष्ट आहे. तेव्हां अशा स्थितींत मला इथं राहतां येणं अशक्य आहे. प्रीतीच्या सान्निध्यांत तर राहायचं, आणि प्रीतीचा उपभोग मात्र घ्यायचा नाहीं असल्या दुहेरी काचांत टिकून राहण्याइतकं माझं मन खंबीर नाहीं हें मला सांगणें भाग आहे. तुझ्याजवळ तर राहायचं आणि तुझ्याशीं बोला-चालायचं नाहीं असल्या विचित्र विरागी प्रीतींत मला एक क्षणभरही राहवणार नाहीं; त्यापेक्षां हें गांवच सोडून गेलेलें बरें असें वाटल्यावरून मी हें गांव सोडून जात आहे.

तुझी भेट घ्यावी असं वाटत असूनही या दोन चार दिवसांत मी सहेतुकपणेंच टाळाटाळ केली आहे तीही या वरील कारणानेंच! आज मात्र तुझी भेट घेण्याची अगदीं अनावर इच्छा झाली आहे, पण तेवढ्यासाठीं मी तुझ्या घरीं मात्र येणार नाहीं. रात्रौ अकराचे

गाडीनें मी जाणार आहे तेव्हां तत्पूर्वी आलीस तरच भेट होईल. यापेक्षां तूर्त जास्त लिहिण्यासारखें असें कांहीं नाहीं. कळावें.

तुझ्या भेटीसाठीं तळमळणारा, तुझा
आज असलेला—पण उद्यां
मात्र तुझा नसलेला—
अभागी
**चंद्रकांत** ”

चंद्रकांतांच्या मनाची केविलवाणी आणि विभ्रम अवस्था माझ्या मनाला तीव्रतेनें जाणवूं लागली. माझ्यावरील प्रेमाची दृढताही मला कळून आली. तें दुसरं पत्र वाचून माझ्या अंत:करणाला असह्य धक्के बसूं लागले. टेनिसन कवीनें म्हटलं आहे—

“ 'Tis better to have loved and lost
Than never to have loved at all.”

अगदीं प्रेम न करण्यापेक्षां प्रेम करून विसरून गेलेलं अधिक बरं असं टेनिसन म्हणतो, पण मला कांहीं हें पटत नाहीं. एकदां प्रेमानं अंत:करण व्याप्त झाल्यानंतर तें प्रेम कधींतरी विसरणं शक्य आहे कां? जें प्रेम विसरलं जाणं शक्य आहे तें खरं प्रेम नव्हेच, बेगडी प्रेम आहे अशीच माझी समजुत आहे. टेनिसनला खऱ्या प्रेमाचें स्वरूपच कळून आलें नसेल म्हणून त्यानें असे उद्गार काढले असतील, किंवा प्रत्येकानें आपल्या आयुष्यांत प्रेम करावं असं तरी त्याचं म्हणणं असेल. टेनिसन म्हणतो ‘प्रेम न करण्यापेक्षां, प्रेम करून विसरून गेलेलं अधिक बरं,’ पण मी म्हणतें ‘प्रेम करून

विसरून जाण्यापेक्षां प्रेम न केलेलंच अधिक बरं.' माझ्या म्हणण्याचा आशय असा, कीं एकदां प्रेमानं अंत:करण व्याप्त झाल्यानंतर तें प्रेम विसरतां येणं अशक्य आहे. प्रेम प्रथम हंसवितं हें खरं, त्याच्या प्रथम दर्शनानं हृदय फुलून जातं, पण हेंच प्रेम एकदां हृदयाचा ताबा घेतल्यानंतर आतां आम्हीं जसें दु:खाच्या पेंचप्रसंगांत सांपडलों आहोंत आणि रडत आहोंत, तद्वत रडायला लावतं. तेव्हां हें असं रडायला लावणारं, दु:ख देणारं, मन:स्वास्थ्य बिघडवणारं व कदाचित् आयुष्याचीही राखरांगोळी करायला प्रवृत्त होणारं प्रेम प्रथमत:च न केलेलं बरं नव्हे का?—मग टेनिसन म्हणतो तें खरं, कीं मी म्हणतें तें खरं!—

कुणी एकानें म्हटलं आहे—हो, आठवलं कवि उपाध्ये—यांनींच आपल्या "सौभाग्य लांछन" नाटकांत म्हटलं आहे कीं, "प्रीतींत सुधेची मधुरता, मदिरेची मादकता आणि हालाहलाची दाहकता सांठवलेली असते." अगदीं सत्य आहे तें त्यांचं म्हणणं! प्रीतींत सुधेची मधुरता आहे. उपभोगाचे वेळीं कैफ चढतो, बेधुंद देहानें प्रीतीचा उपभोग घेतला जातो आणि अखेरीस म्हणजे वियोगाचे वेळीं हालाहलापेक्षां जास्त दाहकता सांठलेली असते हें मला माझ्याच अनुभवावरून कळून आलं.

चंद्रकांतांचं पत्र वाचून क्षणभर तर मी दिग्मूढच झालें. मला अतिशय वाईट वाटलं तें, ते जाणार—मला सोडून जाणार म्हणून. माझ्या अंत:करणावर तीक्ष्ण सुरीचे घाव बसत आहेत असं मला क्षणाक्षणाला वाटे नी असह्य वेदना होत.

ज्या प्रेमाची प्राप्यता आपल्या आयुष्यांत अखेरपर्यंत आपल्याला मिळूं शकत नाहीं त्या प्रेमाच्या सान्निध्यांत राहून आपल्या मनास व्यर्थ शीण देण्यापेक्षां—आपलें मन:स्वास्थ्य बिघडवण्यापेक्षां त्या प्रेमापासून शक्य तों दूरच राहण्याच्या प्रयत्नाला 'स्तुत्य प्रयत्न' असं मी तरी कां म्हणूं नये?

प्रथमत: जरी चंद्रकांतांच्या या अशा विचित्र वर्तणुकीमुळें माझ्या अंत:करणाला धक्का बसला असला, तरी आतां मात्र ते करीत आहेत तेंच बरोबर आहे असं वाटूं लागलं. आणि त्यांना हंसत मुखानें निरोप द्यावा या हेतूनें व त्यांनीं माझ्या भेटीची इच्छा प्रदर्शित केली होती, तेव्हां ती पुरी करण्यासाठीं आणि पुन्हां आतां यापुढें त्यांची भेट केव्हां होईल याचा कांहींच नेम नसल्यामुळें एकदां डोळे भरून त्यांना पाहावं, त्यांची मूर्ती आपल्या अंत:पटलांवर कोरून ठेवावी म्हणून त्यांच्या भेटीला जाण्याची उत्कंठा तीव्रतेनें वाढली.

मी उठले, तोंडावरून पाण्याचा हात फिरवला, केंस वगैरे साफसूफ केले, पातळ बदललं नी तडक चंद्रकांतांच्या घरीं गेलें.—— पण निराशा—!!! चंद्रकांत अद्यापि घरीं आले नव्हते. त्यांच्या भेटीसाठीं मी फार अधीर झालें होतें.

रात्री अकराच्या गाडीनें जायचं आणि आतां तर सायंकाळचे पांच वाजलेले, प्रवासाची कांहीं तयारी केली असावी म्हटलं, तर तेंही कांहीं दिसेना, मग यांचा गांवीं जाण्याचा बेत रहित झाला कीं काय हेंच मला कळेना—मी घरांत गेलें आणि चंद्रकांतांच्या बहिणीला खुलासा विचारला. माझी शंका निरसन झाली. चंद्रकांतांचा परगांवीं

जाण्याचा निश्चय कायम झाला आहे, हेंच त्यांनीं देखील मला सांगितलें.

चंद्रकांतांची भेट घेतल्याशिवाय परत मला घरीं जाववेना! मी चंद्रकांत येईपर्यंत तिथंच बसायचं ठरविलं नी चंद्रकांतांच्या खोलीचा दरवाजा उघडून आरामखुर्चीवर बसून राहिलें.

पुढें होणाऱ्या वियोगाची तीव्रता अंतःकरणाला टोंचूं लागली, जीव त्रस्त झाला–विरहाचीं अनेक कल्पनाचित्रें मनःचक्षूंपुढून भरभर सरकत अन् त्यायोगें मेंदूला ताण पडे–एकीकडे ही वेदना दुःसह होई तर दुसरीकडे, परगांवीं गेलेले दादा माझ्या लग्नाचं ठरवून–यशस्वी होऊन परत आले तर पुढील आयुष्याची काय वाट लागेल–निष्प्रेम जीवनांतच मला आयुष्याची अखेरता गांठावी लागणार कां? हें प्रेम शेवटपर्यंत मला लाभणार नाहीं कां?—वगैरे कल्पनेची भेसूरता माझ्या मनाला भेडसावूं लागली.—विचार–! विचार–!! विचार–!!! विचारांचं नुसतं थैमान माजलं माझ्या मस्तकांत.

विचाराची दिशा बदलली जावी म्हणून टेबलावरच असलेली वही उचलली. निरनिराळ्या पुस्तकांतले उतारे होते ते. अक्षर चंद्रकांतांचंच होतं.—

"शशी, तुझ्याजवळ राहूं नये असं वाटतं–कारण तें अयोग्य आहे–तुझ्यापासून दूरही जातां येत नाहीं कारण तें माझ्या हातचं नाहीं, हृदयाचा तीव्रतेनें तुझ्याकडे ओढा असल्यामुळें तुझ्यापासून दूर जाऊं नये असं वाटतं–पण–पण!!!—तुझी आठवणसुद्धां ठेवूं

नये असं वाटतं कारण ती दुःखमय आहे–हृदयाला जाळणारी आहे. बरं, तुला विसरूनसुद्धां जातां येत नाहीं, कारण तें माझ्या हातचं नाहीं.—अशक्य आहे ग शशी तें—उगाच नाहीं यशवंत कवींनीं कविता लिहिली—

"तुझी विस्मृति ना कदापि घडणें त्वन्नामसंकीर्तन—
व्हायाचें पुढतीं मुखांतुन तसें या रोमरोमांतुन—
मूर्ति स्थावरजंगमीं तव दिसे प्रेमी मना लोचना
जावें मी विसरूनिया तुज कसें, तूंच गे सांगना? ॥ १ ॥"

इतकं मी वाचलं त्या वहींतलं नी टपटप अश्रूंचे थेंब गळूं लागले माझ्या डोळ्यांतून! माझ्या मनाला दुःख झालं, दुःखाची अवस्था परिणत झाली–कुणीतरी त्या दुःखावर मिठाचं पाणी ओतून माझ्या वेदना वृद्धिंगतच करीत आहे असं मला वाटलं—रक्ताची शाई करून लिहीलेलं तें पान होतं.—मी दुसरं पान उलटलं—

"काय भयंकर शक्ती असते स्त्रियांत? शशिकलेचीं सारीं पत्रं पुन्हां पुन्हां वाचावीशीं वाटतात–आणि तीं वाचलीं, कीं सारं शरीर नखशिखांत नाजूक ओठांनीं चुंबिल्यासारखं वाटतं–एका गोड सुखोपभोगी भावनेनीं शरीर फुलकित होतं–पण तें एक क्षणभरच लगेच–चुंबनाचा स्पर्श सुटल्यासारखा वाटतांच देहाच्या कणांकणांतून निखारे तेवत असल्याचा भास होतो.—छे–छे—भास कोणता? भास फक्त चुंबनाचा! निखारे मात्र अगदीं खरेखुरे वाटतात. गार देहाचा ज्वलत् ज्वालामुखी होतो तत्क्षणीं!"

"शशी, तुझ्या नेत्रांत गुरूची गंभीरता आहे, बुधाची चंचलता शशीची शीतलता, मंगळाची आरक्तता आहे आणि शुक्राची प्रेमळता आहे. तुझी दृष्टी तेजस्वी रविकिरणांप्रमाणें प्रकाशदायिनी आहे. समोरासमोर विलसणाऱ्या या नेत्रांच्या तारामैत्रिकांवरून षडाष्टक-खडाष्टक पाहायाचें सोडून आमचे वाडवडील विवाहाची जुळवणी करण्यासाठीं कागदांचे कपटे जुळवीत बसतात हें जास्त आश्चर्याचें नाहीं कां?"

त्या वहींतल्या प्रत्येक पानांतून—पानांतल्या प्रत्येक ओळी-ओळींतून अंतःकरणाची तळमळ व्यक्तविली होती. ते सारे निर-निराळ्या पुस्तकांतलेच उतारे होते—पण त्यांत स्वतःच्या अनुभवाची भर घातली होती. स्वतःला येणाऱ्या प्रत्येक सुखदुःखाच्या क्षणाचें तें टांचणच होतें. शब्द दुसऱ्याचे, पण अनुभव स्वतःचेच!—

मी आणखीही पानें उलटलीं, आणि बरीचशीं पानें वाचून काढलीं. थोडींबहुत पानें शिल्लक राहीलीं होतीं—तींही वाचणार होतें, पण इतक्यांत चंद्रकांत आले. मी खोलींत बसलेली पाहून प्रथम ते थबकले—पण नंतर मात्र शांतपणें येऊन माझ्या समोरच्या टेबलावर बसले.—

बराच वेळ अगदीं स्वस्थ होते ते! त्यांच्या चेहऱ्यावर कारुण्यपूर्ण भाव अगदीं स्पष्ट दृग्गोचर होत होता.

"शशी"—अगदीं कारुण्यपूर्ण स्वरांत त्यांनीं हांक मारली. त्यांच्या आवाजांत आर्तता अगदीं ओतप्रोत भरली होती. हांक ऐकून

मलाही फार वाईट वाटलं—माझ्या हृदयाचं पाणी-पाणी झालं त्या हांकेनं!

"मी जाणार—दूर, दूर—जितक्या दूर मला जातां येणं शक्य आहे तितक्या दूर मी जाणार. पुन्हां मी परत येईनच हें नक्की नाहीं. यापुढें मला तुझ्या प्रत्यक्ष प्रीतीचा रसास्वाद घेतां येणार नाहीं. तुझ्या वियोगानें माझें अंतःकरण करपून जाईल. क्षणोक्षणीं तुझी आठवण होईल, पण इतक्यांतूनही माझ्या हृदयाला पूर्ण समाधान वाटेल अशी एकच गोष्ट माझ्याजवळ शिल्लक राहिली आहे. आणि ती म्हणजे—

"अशी एक ती मदीय होती प्रेमाची खाण—
निदान हें तरि हरून नेईल कोण समाधान?"

शशी, मी तुला विसरणार नाहीं, पण तूं नाहीं ना मला विसरणार?" माझे दोन्ही हात अगदीं प्रेमभरानें त्यांनीं आपल्या हातीं घेतले अन् माझ्या दृष्टीला दृष्टी मिळवून, चेहऱ्याकडे एकाग्रपणें न्याहाळून पाहात मला काकुळतीनें विचारलं.

"शशी, मी तर तुला विसरणं शक्यच नाहीं, इतकेंच नव्हे, तर—

"चिंतन तुझें, पूजन तुझें श्वास हेच मंत्र
उरल्या आयुष्यांत न उरलें अतां अन्य तंत्र."

आहाहा! किती थोर हृदय आहे चंद्रकांतांचं! किती उदात्त प्रेम आहे माझ्यावर त्यांचं! थोडक्या शब्दांत त्यांनीं आपला आशय स्पष्ट

केला, पण तेवढ्यांत किती अगणित प्रीत-संपत्ति त्यांनीं माझ्या स्वाधीन केली! मस्तक भारावलं अन् नम्र झालं माझं त्यांच्या उदारत्वामुळें. क्षणमात्र मी अगदीं भांबावून गेलें होतें.

चंद्रकांतांनीं माझी हनुवटी उचलली, अन् "शशी, शेवटचंच बरं का हें? पहिल्या चुंबनाची गोडी अनेकांनीं चाखली असेल, आपणही ती चाखली आहे, पण शेवटच्या चुंबनाची गोडी फारच थोड्यांना चाखायला मिळाली असेल. घेऊं कां तुझं चुंबन?" म्हणाले.

मी डोळे मिटून अगदीं स्वस्थ होतें. त्यांनीं माझं चुंबन घेतलं; आणखी एक घेतलं; पण तें शेवटचं नव्हतं.—

   

चंद्रकांतांना निरोप देण्यासाठीं आईला विचारून आठ वाजतांच मी चंद्रकांतांच्या घरीं आलें होतें. मी आलें त्यावेळीं चंद्रकांत जेवायला बसले होते. चंद्रकांत जाणार म्हणून त्यांच्या बहिणीनें जेवणासाठीं विशेष कांहीं केलं होतं—मलाही जेवणाचा आग्रह केला, पण मी नुकतीच जेवून आले असल्यानें त्यांच्या आग्रहाला नाइला-जानें मला नकार द्यावा लागला. अति आग्रह होऊं लागला तेव्हां त्यांच्या मनाला वाईट वाटूं नये म्हणून फक्त थोडींशीं कांद्यांचीं भजीं मात्र मी खाल्लीं.

जेवण आटोपल्यावर चंद्रकांत आपल्या खोलींत गेले, त्यांच्या मागोमाग मीही त्यांच्या खोलींत गेलें. त्यांनीं कपाटांतून कांहीं पुस्तकं व वह्या काढून बॅगमध्यें भरण्यास सुरवात केली. मीही

त्यांच्या कामांत हातभर लावूं लागले, पण त्यांनीं गोड शब्दांत मला मनाई केली. पंधरा वीस मिनिटांत त्यांनीं सर्व बांधाबांध केली.

सुमारें नऊ वाजतांच चंद्रकांतांनीं तांगा बोलावून आणला. गाडी अकरा वाजतां असतांना त्यांनीं इतक्या लवकर कां निघावं याचा मी साश्चर्य विचार मनाशीं करूं लागले. चंद्रकांतांच्या बहिणीलाही त्याबद्दल आश्चर्य वाटल्यावांचून राहिलें नाहीं. त्यांनीं त्याबद्दल चंद्रकांतांना खुलासाही विचारला.

"स्टेशनवरील चाळींत माझा मनोहर नांवाचा स्नेही आहे, त्यांनीं मला इतक्या लवकर मुद्दाम बोलावलं आहे. गाडी येईपर्यंत मी त्याच्याकडे बसणार आहे." चंद्रकांतानीं उत्तर दिलं.

तांग्यांत चढतां चढतां चंद्रकांतांनीं झटकन् मोठ्या शिताफीनें माझ्या हातीं पत्र दिलें. मी पोलक्याच्या खिशांत ठेवलं.

तांगा दिसेनासा होईपर्यंत आम्ही दरवाजांत उभे होतों. मी वरीं जाण्यासाठीं परत निघाले—वाटेंत एका दिव्याखालीं मी चंद्र-कांतांनीं दिलेलं पत्र पोलक्याच्या खिशांतून काढलं, फोडलं, कागदाची घडी उलगडली—त्यांतून पावली खालीं पडली. मी ती उचलून घेतली, पत्र संपूर्ण वाचलं अन् झटकन् तांगा ठरवून स्टेशन गाठलं.——

स्टेशनच्या चाळीवरील फाटकाशीं तांगा उभा राहिला. मी तांग्यां-तून उतरलें अन् जिना चढून वर गेलें. पत्रांत चंद्रकांतांनीं खोलीचा नंबर दिला होताच. नंबर शोधींत शोधींत मी खोलीच्या दाराशीं गेलें, आंत डोकावून पाहिलं—आंत खाटेवर कपडे काढून चंद्रकांत

पसरलेले दिसले मला. त्यांची बॅग अन् वळकटी दरवाजाजवळच ठेवली होती—

दरवाजावरील कडी वाजवली मी. चंद्रकांतांनीं वळून दरवाजाकडे पाहिलं. मला पाहतांच ते झटकन कॉटवरून उठले अन् माझ्याकडे आले. "माझी खात्री होतीच तूं येशील म्हणून—वाटच पाहत होतो मी तुझी. ये, आंत ये शशी."

मी आंत गेलें, आम्ही दोघेही कॉटवर शेजारीं शेजारीं बसलों; पावणे दहा वाजले होते.

"अकराचे ऐवजीं तीनच्या गाडीनें जाण्याचं ठरविलं आहे मी शशी." चंद्रकांत म्हणाले. मला आश्चर्य वाटलं त्यांचे ते उद्गार ऐकून आणि मला वाटलेलं आश्चर्य मी व्यक्तही केलं.

माझ्या शंकेचं त्यांनीं निरसन केलं. त्यांचा स्नेही मनोहर रात्र-पाळी असल्यानें अकराचे गाडीसाठीं स्टेशनवर गेला होता. त्या सबंध खोलींत आम्हीं दोघेंच होतों. चंद्रकांत उठले, त्यांनीं माझी हनुवटी धरली अन् मला विचारलं.... "शशी...."

मीही अंध बनले होतें. पूर्ण भावना विवशतेनें मी त्यांना होकार दिला.—

खोलीचा दरवाजा बंद केला, दिवा मालवला. त्या खोलींतल्या अंधारांत आम्ही आमच्या प्रेमाच्या उपासनेचें पारणें फेडलें.

  

बरोबर अकरा वाजतां मी टांग्यांतून परत घरीं आले. वरीं

आल्याबरोबर मी बिछान्यावर अंग टाकलं. तळमळ तळमळ व्हायला लागली. झोंप येईना मला. थोड्या वेळानंतर मला झोंप लागली. झोंपेंत दोन तीन वेळां मी दचकून उठले. पण माझी ती भीति कुणाच्या नजरेला आली नाहीं ही मेहेरबानीच !

चंद्रकांतांनीं मला खर्चासाठीं दहा रुपये दिले होते. त्यांचं पत्र येतांक्षणींच मीं कुणालाहि न कळवतां गुपचूपपणें चंद्रकांतांकडे जायचं, असं आम्ही (मी आणि चंद्रकांतांनीं) ठरविलं होतं. नव्हे, तसा निश्चय झाला होता आमचा.

निश्चय ! निश्चय ! ! निश्चय ! ! !

आमचा निश्चय कायम झाला होता. मी चंद्रकांतांना वचन दिलं होतं.

हाच निश्चय माझ्या मनाला आतां भेडसावूं लागला होता.

# प्रकरण ११ वें—स्मृति–दाहक कीं शीतल ?

**चंद्रकांतानें लिहिलेली हकीकत:—**

आठ दिवस झाले, मला इथं येऊन !. राहून राहून प्रत्येकवेळीं मला शशिकलेची आठवण होते, अन् त्या आठवणीसरशीं वियोगाची तीव्र जाणीव होऊन अंतःकरण विदारून जातं.

अद्याप नोकरीही लागली नाहीं; पण लागेल लौकरच ! नोकरी लागली, कीं ताबडतोब पत्र पाठवून शशिकलेला बोलावून घ्यायचंच ! माझं पत्र पोहोंचतांक्षणींच तत्काल येण्याचं तिनं मला वचन दिलं आहे. तिथं, अशारीतीनें गुपचूपपणें यायचं असल्यानें कुणाकडूनही गाडीभाड्यासाठीं पैसे मिळणार नाहींत हें अगदीं उघड आहे. आणि म्हणूनच मी, इकडे येतांना स्वतःच्या टंचाईकडे यत्किंचित्‌ही लक्ष न देतां दहा रुपये तिला देऊन आलों आहे.

त्या रात्रीची–स्टेशनवरील चाळींत केलेल्या कृत्याची आठवण होते अन् कांहीं क्षण त्या आठवणीनें मन तल्लीन होऊन जातं. त्या तल्लीनतेंत आजूबाजूच्या जगाला मी पूर्ण विसरून जातों. याही वेळीं आपण त्याच कृतीचा अनुभव घेत आहोंत असा भास होतो, अन् केतकीच्या बनांत सुगंध लहरींनीं भारावलेला अन् मोहून गेलेला पन्नग आनंदानें बेहोष होऊन डोलत राहात नाहीं का ? तद्वतच, मीही त्या भासांत कांहीं क्षण तरी आनंदानें बेहोष होऊन डोलूं लागतों.

वसन्तश्रीचं मनोहारी यौवन, पौर्णिमेची सुषमा, कलांचें लालित्य आणि सुमनांची शुचिता या सर्वांचा गोड समन्वय जिच्या सौंदर्यांत झाला आहे अशी माझी सुंदर शशिकला माझ्या मनश्चक्षूंसमोर उभी राहते अन् हंसतमुखानं माझ्या मनावरील इतर व्याधी-उपाधींचें दडपण कमी करण्याचा प्रयत्न करते आहे असं वाटतं. आणि त्या तशा वाटण्यांतच आपण स्वर्गसुखाचा आनंद सेवीत आहोंत याची प्रत्यक्ष जाणीव होते व क्षणभर मनाला आल्हाद वाटतो. स्मृतीच्या आनंदांतही कांहीं विशेष प्रकारची मादकता दडलेली असते ही गोष्ट निर्विवाद सत्य आहे.

वसन्तऋतूंत साऱ्या सृष्टीला नवयौवन प्राप्त होतं. पायांत नुपूर घालून अन् तनूवर शृंगारिक साज पेहरवून, हंसतमुखानें आणि प्रसन्न मनानें आपल्या प्रियकराच्या भेटीला, मनाला आल्हाद देणाऱ्या शांत-सुरम्य रात्रीं, ठुमकत ठुमकत जाणाऱ्या गजगामिनी, मुग्धा, नवयौवना रमणीकडे पाहिल्यानंतर आल्हादकारक अन् कांहींशा मादक लहरी हृत्कासारांत उसळूं लागतात, तद्वत् वसन्तऋतूंतल्या सृष्टीकडे पाहिलं म्हणजे हृत्कासारांत अननुभूत संवेदनांच्या वीचि उसळूं लागतात. परिणत यौवनानें मुसमुसलेल्या सृष्टीच्या तनूवर कांद्याकुऱ्यांचीं रोमांचं विलसलेली पाहून प्रियकराच्या पहिल्याच भेटींत लज्जेनीं आणि कांहींशा भीतीनें धरणीला न्याहाळून पाहात असलेल्या लज्जावतीच्या सकंप शरिराची स्मृति होऊन मन आनंदानें भारावून जातं.

## निखारा

महाराज बागेंतल्या गार हिरवळीच्या गालिच्यावर मी एकटाच जेव्हां स्वस्थ विचार करीत पसरलेला असतो, तेव्हां मला या यौवनावस्थेंतल्या सृष्टीकडे पाहून हे विचार सुचूं लागतात, अन् त्याबरोबरच शशिकलेची मूर्ति डोळ्यांसमोर उभी राहते, व सृष्टीच्या यौवनाशीं शशिकलेच्या परिणत यौवनाची मी स्वतःशींच तुलना करूं लागतों. आणि तुलना करतांना कांहीं क्षण मन उन्मादून बेहोष होतं.

संध्येचा नीलिमा, पौर्णिमेचा धवलिमा आणि उषेचा रक्तिमा या गोष्टी कुणाच्या मनाला आल्हाद देत नाहींत? शशिकलेच्या अंगावरील संध्येच्या नीलिमेप्रमाणें शोभणारी ती नीळी साडी, पौर्णिमेच्या धवलिमेप्रमाणें शोभणारा, तिच्या मांसल दंडाला वेष्टिलेला तो पांढरा शुभ्र जंपर आणि या सर्वांवरही ताण करणारा, तिच्या पुष्ट, गुबगुबीत गालांवरील उषेच्या रक्तिमेशीं तोड करूं पाहणारा रक्तिमा—या सर्वच गोष्टी अद्यापदेखील मला जशाच्या तशाच दिसतात अन् कवि माधवज्यूलिअनच्या काव्याची आठवण होऊन त्यांच्या कवितेंतल्या ओळी जशा सुचतील तशा गुणूंगुणूं लागतों.

"देऊं नको तूं चुम्बनें, देऊं नको आलिंगनें—
देऊं नको तूं दर्शनें—मी धर्म माझा आचरीं
हे हृत्प्रभे, हे दुर्लभे, हे स्वाभिमानी भामिनी
हे कामिनी, हे स्वामिनी येऊं नको तूं पंजरीं.
ताजी कळी तूं कोवळी, राही कुठेंही मोकळी
बाधा वियोगाची मुळीं नाहींच वायूला परी

हें रक्त तारुण्यांतलें देहांत नाचूं लागलें
खेळो खुळे प्रेमागळे थांबेल हे कालांतरीं—

   

पंधरा दिवस झाले मला इथं येऊन ! एकंदर जगाविषयीं माझी मूळची जी कल्पना होती ती सध्यां पार बदलून गेली असून जगांतला सारा दांभिकपणा अन् जगाची सारी झब्बुशाहीच जिथंतिथं माझ्या नजरेसमोर प्रत्येकवेळीं येऊं लागली. सच्चा दिलाचं जग नसून तें लबाड आहे, स्वार्थी आहे असा मला पदोपदीं अनुभव येऊं लागला.

इथं आल्यानंतर एका प्रकाशकाची ओळख करून घेतली अन् नुक्तीच लिहून पुरी केलेली "देव कीं दगड ?" ही कादंबरी प्रकाशित करण्यास्तव त्यांचेकडे हेलपाटे घालूं लागलों. प्रथम तर कांहीं दिवस त्यांनीं पूर्ण टाळाटाळीच केली, पण पुढें एके दिवशीं अनपेक्षितपणें त्यांनीं आपणहोऊनच मला दुसरी कादंबरी लिहीण्यास सांगितली. मात्र तें सांगतांना "त्या कादंबरीवर तुमचं नांव लेखक म्हणून मी घालणार नाहीं, तर माझं नांव घालीन अन् प्रसिद्ध करीन. त्याबद्दल तुम्हाला रोख पन्नास रुपये तत्काल देईन." हेंही सांगण्यास ते विसरले नाहींत. मी तर दिग्मूढच झालों त्यांचे ते उद्गार ऐकून.

लिखाणाच्या धंद्याविषयीं माझ्या मनांत जी कल्पना दृढ झाली होती ती पार एकदम धुळीला मिळाली. प्रत्येक कादंबरीला निदान कमींत कमी १०० ते १५० रु. तरी नवख्या लेखकाला मिळत असले पाहिजेत ही माझी कल्पना ; पण ही कल्पना एकदम ठार

झाली. मीच कादंबरी लिहायची त्याचे फक्त पन्नास रुपये मी घ्यायचे अन् त्यावर नांव कमवायचं या भांडवलदार झब्बूंनीं! माझ्या अंतःकरणाला किती घरं पडलीं असतील याची यथार्थ कल्पना ज्यांना या गोष्टींचा अनुभव आला असेल असा लेखकच करूं शकेल. मी त्या प्रकाशकावर बराचसा रुष्टच झालों, पण माझा मनोभाव व्यक्त करण्याची ती परिस्थिति नव्हती म्हणून मुकाट्यानं मी त्यांचं ऐकून घेतलं.

मनुष्य अडचणींत सांपडला म्हणजे त्याच्या अडचणीच्या परिस्थितीचा फायदा हे स्वार्थी लोक कोणकोणत्या तऱ्हेनीं घेतात याचा मला हळूंहळूं अनुभव येऊं लागला. अन् त्या अनुभवाच्या दृढतेबरोबरच एकंदर जगाविषयीं—नव्हे, भांडवलशाहीविषयीं मला तिटकारा वाटूं लागला.—

जगांत स्वार्थसाधू-तशींच स्वार्थत्यागीं, लबाड तशींच सच्चीं, दुष्ट तशींच सुष्टही हृदयं असतात याचीही मला जाणीव झाली. एका चांगल्या प्रथित यश लेखकाची आणि मराठी पत्रसृष्टींत ज्यांनीं उत्तम गुणांनीं आपलं स्थान कायम केलं आहे, ज्याचा हजारोंनीं खप आहे अशा एका लोकप्रिय वृत्तपत्राच्या मुख्य संपादकाचीही ओळख झालेली होती. या मुख्य संपादकांच्या ओळखीनें माझा बराच फायदा झाला होता. यावेळींच सुप्रसिद्ध देशभक्त सावरकरांना स्थानबद्धतेंतून मुक्त करण्यांत आले होतें, तेव्हां ते यापुढें कॉंग्रेसला मिळतील, कीं लोकशाही स्वराज्य पक्षाला मिळतील याविषयीं मला जें वाटतं तें प्रामाणिकपणें लिहून आणण्यास त्या मुख्य संपादकांनीं सांगितलं होतं.

आणि त्यांच्या सांगण्याप्रमाणें "बॅ. सावरकरांविषयीं भविष्य जिज्ञासा" या मथळ्यानें मी लेख लिहून त्यांना दिलाही. आपलीं सारीं कामं बाजूला टाकून आधीं त्यांनीं माझा लेख वाचला. हवी असलेली आणि आवश्यक तेवढी सुधारणा स्वतः करून तो लेख तत्काल छापण्यास पाठविला व त्याबद्दलचा योग्य तो मोबदलाही त्याचवेळीं त्यांनीं मला दिला. कृतज्ञतेनीं त्यांचे आभार मानले मी.

हें थोर अन् दयाळू अंतःकरण कोणीकडे, आणि मी लिहिलेल्या कादंबरीवर आपलं नांव घालून मला पन्नास रुपये देऊं करणाऱ्या त्या प्रकाशकाचं स्वार्थी अंतःकरण कोणीकडे ! किती जमीनअस्मानाचा फरक या दोहोंत !—

माझी नाराजी पाहून प्रकाशकांनीं आपलं म्हणणं सोडून दिलं आणि पुढें मला फक्त पंचवीस रुपये देऊन माझी कादंबरी त्यांनीं घ्यायची ठरविली. मीही बिकट परिस्थितींत होतो, तेव्हां त्या पंचवीसालाही मी तयार झालों, अन् त्यांच्या स्वाधीन कादंबरीचें हस्तलिखित केलें.

या प्रकाशकांनींही माझ्यावर अनंत उपकार केले. मी त्यांचे उपकार आजन्म विसरणार नाहीं. पण त्यानीं प्रथमतःच जी भाषा वापरली, त्यामुळें त्यांनीं केलेल्या उपकारावर विरजण पडलें गेलें. त्यांच्या उपकारानें त्यांच्यापुढें जेवढ्या प्रमाणांत मस्तक आदरानें नम्र होतं, तेवढयाच प्रमाणांत त्यांच्या स्वार्थी भाषोच्चारानें मस्तक अनादरानें भारावून जातं.

मात्र एकंदरींत या पंधरावीस दिवसांत जगाचा सारा व्यवहार

लबाडीनें अन् लपवाछपवीनेंच चाललेला आहे एवढं मला उघडपणें कळून आलं. जगांत सर्वांत जास्त भरणा सुष्टांपेक्षां दुष्टांचा, सच्चांपेक्षां लबाडांचा, स्वार्थत्याग्यांपेक्षां स्वार्थसाधूंचाच आहे याची जाणीव होऊन, जगाच्या झब्बूशाहीविषयींच्या विचारांनीं माझ्या मनांत गर्दी केली, सर्वत्र बजबजपुरी माजली, त्यांत दांभिकता, क्रूरता अन् नीचता या सर्वांचाच हलकल्लोळ उफाळला. मन गांगरलं—जगाच्या या दांभिक व्यवहाराला पाहून घाबरलं.—

   

कादंबरीची छपाई जवळ जवळ संपत आली होती. मी एका सुप्रसिद्ध लेखकाला प्रस्तावना लिहिण्याची विनंति केली, आणि त्यांनींही माझ्या विनंतीला मान देण्याचें कबूल केलें. पण प्रकाशकांच्या अनिच्छेमुळें मला एका सुप्रसिद्ध लेखकाच्या प्रस्तावनेला मुकावें लागलें. प्रकाशकांनीं आपल्या एका विद्वान अन् वाङ्मय प्रेमी स्नेह्यांकडून प्रस्तावना लिहवून घेतली. "अर्पणपत्रिका घालायची आहे कां ?" असें मला विचारलें. मी तत्काल होय म्हटलें अन् शशिकलेच्या नांवानें अर्पण पत्रिका लिहून दिली. आतां प्रकाशकही बरेच मोकळेपणानें अन् खेळीमेळीनें माझ्याशीं वागत होते. अर्पण पत्रिकेचा मजकूर वाचून त्यांनीं इष्ट तोच अर्थ काढला व माझी बरीच टिंगलही केली.

माझ्या हृदयाला त्यांची ती टिंगल एकीकडून टोंचूं लागली तर दुसरीकडून गुदगुल्या करूं लागली.

माझी ही पहिलीच कादंबरी होती. पुष्कळशा लेखकांनीं आपल्या पहिल्या पुस्तकाची अर्पण पत्रिका आईच्या, वडिलांच्या किंवा तशाच प्रेमी सुहृदांच्या नांवें लिहिली असेल, पण माझ्या सारखा आपल्या प्रेयसीला पहिलें पुस्तक अर्पण करणारा लेखक विरळाच !

पुन्हां दुसरें पुस्तक केव्हां प्रसिद्ध होईल याची खात्री नसल्यामुळें अन् आलेली संधी दवडायची नसल्यामुळें मी शशिकलेला पुस्तक अर्पण केलं अन् माझ्या प्रेमाचं प्रतीक अमर केलं. पुढें कदाचित् प्रेमभंग झालाच, तर निदान या अर्पण पत्रिकेच्या स्वरूपांत प्रेमाची स्मृति कायम राहून कांहीं क्षण तरी अंतःकरण समाधान पावेल याही एका दृढ आशेच्या आहारीं जाऊन मी तें पुस्तक शशिकलेला अर्पण करण्यास धजावलों.

रात्रीं झोंपेंतसुद्धां चार वेळेस अर्पण पत्रिकेंतला मजकूर मला अगदीं ठळक अक्षरांत दिसला.

**"इंदू दर्शनानें सिंधूला भरती येते, तद्वतच जिच्या वदनेंदु दर्शनानें मत्हृत्सिंधूला भरति येते, त्या माझ्या प्रिय शशिकलेस सप्रेमार्पण."**

पुस्तक टोपण नांवानेंच प्रसिद्ध व्हावयाचें असल्यानें मला इतक्या स्पष्ट शब्दांत अर्पण पत्रिका लिहायला कसलीच भीति वाटली नाहीं.

  

शशिकलेचे ते काळेभोर लकार मंडित कुरुळे केस, तें भव्य कपाळ, शुभ्र ज्योत्स्नेप्रमाणें विलसणारे ते पाणीदार टपोरे नेत्र,

प्रत्यंचा ताणलेल्या धनुष्याप्रमाणें तिच्या त्या नाचऱ्या वक्र भ्रुकुटी, ती लालसर जिवणी आणि त्यांत दडून राहिलेली ती मोहक शुभ्र मौक्तिक माला, तो भरदार गळा तिचा तो उन्नत पुष्ट उरोभाग सारं सारं अगदीं स्पष्ट दिसतं आहे मला. प्रत्यक्ष शशिकलाच माझ्यापुढें उभी आहे असं मला वाटतं आणि तिला बाहु पाशांत घेण्यासाठीं माझे दोन्ही हात अधीरतेनें पुढें होतात. पण ? ? ?

भासावस्थाच मनाला क्षणभर आल्हाद देते, कांहीं क्षण हृदयांत अननुभूत संवेदना तरळायला लागतात अन् गोड गुदगुल्या होऊं लागतात, पण तो भास—भासच ! भासावस्था ओसरून प्रत्यक्ष स्थितीची जाणीव झाली, कीं साऱ्या शरीराला जळजळीत निखाऱ्यांचा चटका बसतो आहे असं वाटून असह्य वेदना होतात. विरह दुःख दढावूं लागतें.

तिच्या कपाळावरील ती नागमोडी रेषा, त्याकडे पाहिलं, कीं ती एक जणूं नभोगंगाच वाहते असं वाटून अगदीं मंत्रमुग्धतेनें सारखं पाहात राहावं अशी आकांक्षा बळावते—मन उन्मादून बेहोष होतं आणि अखेर त्याच ठिकाणीं अखंड कोर होऊन राहावं असा हव्यास वाटूं लागतो. तिच्या त्या भरदार बुचड्यावर खोवलेल्या केतकीच्या मोहक पीतपर्णाकडे दृष्टी जातांच मनांत त्याच्या विषयीं हेवा उत्पन्न होतो. शकुंतलेच्या वदनेंदुभोंवतीं भिरभिरणाऱ्या भृंगाचा दुष्यंताला हेवा वाटला होता असं कालिदासानें लिहीलं आहे. शाकुंतलांतला तो श्लोक वाचतांना मला हंसूं आलं होतं. ती अशक्यकोटींतली—असंभाव्य गोष्ट होय असं वाटलं होतं. यःकश्चित बुद्धीहीन भ्रमराला पाहून सुजाण आणि

सुविद्य दुष्यंताच्या मनांत त्याच्यांविषयीं हेवा उत्पन्न झाला तरी कसा असा मी विचार करी आणि अखेरीस ती अशक्य गोष्ट कालिदासानें स्फूर्तींतच लिहून ठेवली असली पाहिजे अशी माझी खात्री होई—पण त्यावेळचा तो भ्रम होता—आतां यावेळीं स्वानुभवावरून त्याची सत्यता पटून आली मला. तो भ्रमर सजीव तरी होता, पण हें तर निर्जीव केतकीचं पर्ण! आणि त्याचा मला हेवा वाटत होता—त्यापेक्षां माझीच काया कांचनाची असती तर त्याठिकाणीं त्या पर्णाऐवजीं मीच स्थानापन्न झालों नसतो का? असा विचार मनांत उद्भवे अन् त्या केतकीच्या पीतपर्णाचा हेवा वाटे.

   

आतां माझे दिवस जरा बरे चालले होते. प्रकाशकमहाशयांनीं बऱ्याच ठिकाणीं माझी ओळख करून दिली होती. शिवाय ते सहृदय मुख्य संपादक—ते प्रेमळ प्रथित यश लेखक—सर्वांच्या सहानुभूतीनें माझे दिवस बरे चालले होते, मला कशाचीच कमतरता पडत नसे.

एवढ्या अवधींत मी शशिकलेला दोन पत्रें धाडलीं होतीं आणि तिचींही तीन पत्रें मला आलीं होतीं.

आजच्या पत्रांत तर निकडीनें बोलावून घेण्याविषयीं तिनें अगदीं निर्वाणीनें लिहीलें होतें.

तें पत्र वाचल्यानंतर तिला बोलावून घेण्याविषयीं मीही उद्युक्त झालों अन् त्याबाबतची सारी व्यवस्था यथासांगपणें करण्याच्या तयारीला लागलों.

निखारा

एका बड्या हॉटेलचे मालक माझे अगदीं जिव्हाळ्याचे स्नेही होते. त्यांच्या विचारानें जे ठरेल त्याप्रमाणें करायचं असा विचार करून मी तत्काल त्यांच्याकडे गेलों.

   

## शशिकलेनें लिहिलेली हकीकत

आज चंद्रकांतांचं पत्र आलं. पत्र पाहतांक्षणींच किती आनंद झाला मला. हर्षाच्या नुसत्या उकळ्या फुटत होत्या माझ्या अंतःकरणांत. कधींही उपभोगायला न मिळालेल्या आनंदाचा आस्वाद घ्यायला मिळाला. प्रत्यक्ष चंद्रकांतांचीच भेट झाली इतका हर्ष झाला मला.

किती गोड भाषेंत लिहीलं होतं पत्र. कोवळ्या उन्हांत सूर्याचीं सोनेरीं किरणं झाडांच्या कोवळ्या पानावर पडलेलीं पाहिलीं म्हणजे जो अनुपमेय आनंद वाटून मन प्रसन्न होतं तद्वत् त्यांच्या पत्रांतला मजकूर वाचून माझ्या मनाला आल्हाद झाला अन् मन प्रसन्न झालं. त्यांतही विशेषतः त्या कोवळ्या उन्हांत थोडीशी पावसाची झिमझिम पडून गेली, म्हणजे सृष्टीदेवी नवतेजानें आपल्या अस्तित्वाची जाणीव करून देते, नव्हे ती तशी जाणीव आपल्या मनाला होऊं लागते अन् तिच्याकडे पाहून, चित्तवेधक वेशभूषा केलेल्या आपल्या आईकडे प्रथमच भांबावलेल्या नजरेनीं पण प्रसन्न मनानें पाहणाऱ्या लहान बालकाच्या मनाला जो नवा, न उपभोगलेला आनंद होतो आणि कांहीं क्षण भान हरपून अगदीं पूर्ण तन्मय होतो. यावेळीं मनाला जो

आनंद होतो, तोच किंबहुना त्याहीपेक्षां जास्त आनंद मला त्या पत्रांतल्या मजकुरानें झाला.

* * * *

एकलेपणाची आग मोठी असह्य आहे. दहाबारा दिवसच झाले असतील चंद्रकांतांना जाऊन, पण तेवढ्या अवधींत मी एकटीच आहे असं क्षणोक्षणीं माझ्या मनाला अती तीव्रतेनें वाटूं लागतं. चंद्रकांतांच्या सहवासांत घालविलेल्या कालाची स्मृति होते अन् त्या स्मृतीनंच जीव व्याकळून जातो, कासावीस वाढूं लागते—तगमग तगमग व्हायला लागते अंतःकरणांत! दिवसांतला माझा बराचसा वेळ आईच्या, दादांच्या, लिलीच्या आणि मैत्रिणींच्याही सहवासांत जातो, पण माझं मन त्या सहवासांत पूर्वी इतकं रमत नाहीं, पूर्ण तन्मय होत नाहीं. प्रत्येक वेळीं या ठिकाणीं माझे चंद्रकांत असते तर—अशी कल्पना सुचते मनाला प ग लगेच—छे, इथं नाहींत चंद्रकांत असं वाटून मन उद्विग्न होतं. एकलेपणाची आग भडकते, तळमळ वाढूं लागते, जीव कासावीस होतो, व्याकळून जातो.

अशावेळीं मी खोलींत जाते, दरवाजा लावून घेते अन् चंद्रकांतांचा फोटो समोर ठेवून एकाद्या भ्रमिष्टाप्रमाणें एकाग्रतेनें पाहात बसते. त्या फोटोशीं बोलते—आणि—आणि—मुकेही घेतें त्या फोटोचे मी.

देवादिकांचं वेड लागलेले भक्तसुद्धां आपल्या आवडत्या देवाच्या मूर्तीशीं असाच चाळा करीत अन् भक्तीच्या सोपान परंपरा गांठीत याची सत्यता पटली मला. माझा देव चंद्रकांत—मी माझ्या देवाची भक्तीण—

माझ्या अंत:करणांतील माझ्या देवाविषयींचा खरा भाव, देवाच्या मूर्तीकडे—फोटोकडे पाहून कां उफाळून येऊं नये? भक्तीच्या सोपान परंपरा चार आहेत—समीपता, सलोकता, सरूपता, आणि सायुज्यता? मला या भक्तीच्या चारही परंपरा गांठतां येणार नाहींत का? अवश्य गांठतां येतील.

प्रेम हें उपजत, उपभोगात्मक आणि उदात्त असतं म्हणतात. मग माझं चंद्रकांतांवरील प्रेम कोणत्या प्रकारचं असेल बरं? उपजत? उपभोगात्मक....अंऽऽऽऽकीं, उदात्त? कांहींच निर्णय होत नाहीं. प्रत्येक ठिकाणीं मन साशंकित होतं. उपजत प्रेम म्हणावं तर तें शक्य नाहीं. उपजल्यापासूनच कांहीं मी त्यांच्यावर प्रेम करूं लागले नाहीं, तेव्हां उपजत प्रेम म्हणतां येणं अशक्यच आहे, नव्हे का? मग? उपभोगात्मक? छे, तेंही शक्य वाटत नाहीं. उपभोगाच्या लालसेनीं कधीं आम्ही एकमेकांवर प्रेम केलं आहे? उपभोग! प्रेम बसल्यानंतर तें या क्षणापर्यंत आम्हीं कांहीं कधीं उपभोग लालसा प्रबल होऊं दिली नाहीं. मग? उदात्त प्रेम? पण उदात्त प्रेम कशाला म्हणायचं? उदात्त प्रेमाची व्याख्या तरी काय?

विचार करतां करतां 'प्रेम ही काय चीज आहे?' याची स्पष्ट जाणीव स्पष्ट शब्दांत हर्बर्ट स्पेन्सरनें केल्याचें आठवतें. तो म्हणतो—

"Round the physical feeling forming the nucleus of the whole are gathered the feelings produced by personal beauty, that constituting simple attachment, those of reverence, of love, of approbation, of

self esteem, of property, of love, of freedom, of sympathy. These all greatly exalted severally tending to reflect there excitements on one another unite to form the mental state–we call love."

तीन पत्रं मी चंद्रकांतांना पाठविलीं. त्यांच्याकडून मला त्या तीन्ही पत्राचीं उत्तरंही आलीं. पण त्या उत्तरीं-पत्रांत मला 'निघून येण्या-बद्दलचा' मजकूरच नव्हता. "गेल्यानंतर शक्य तितक्या लौकर मी तुला बोलावून घेईन" असं मला आश्वासन देऊन अन् तुमच्या पत्राबरोबर तत्काल पहिल्या गाडीनें तुम्हांकडे निघून येईन असं माझ्याकडून वचन घेऊन ते गेले होते. पण त्यांना जाऊन आतां महिना होत आला, अद्याप कां बरं ते मला बोलावून घेत नाहींत? त्यांच्या भेटीसाठीं किती उत्सुक झालें आहें मी!

दादा नुकतेंच गांवाहून आले होते. त्यांना पाहिल्याबरोबर एकदम उरांत धडकीच भरली माझ्या. ते गांवाला गेले होते ते माझ्या लग्नाचं निश्चित करण्यासाठीं. तेव्हां आतां ते माझ्या लग्नाचं निश्चितच करून आले आहेत कीं काय असं वाटून क्षणभर भांबावून गेलें मी! माझ्या डोळ्यांना कांहींच दिसेना–अंधारीच आली मला. जिन्याच्या कठड्याला धरून काहीं वेळ अगदीं स्तब्ध उभी राहिलें नी थोड्या-वेळानें जिना उतरून खालीं गेलें.

मी न्हाणींत गेलें–तोंड, हातपाय धुतले–केसावरून हात फिरवला, केस नीट साफसूफ केले अन् बाहेर आलें. स्वयंपाकघरांत आईशीं

दादा बोलत बसले आहेत असं आढळून आलं मला. त्यांची कुजबुज मला उभ्या जागीं ऐकूं येत होती. माझी जिज्ञासा वाढली. ते काय बोलत असावेत हें जाणण्याची तळमळ लागली माझ्या हृदयाला. मी हळूच हलक्या पावलानें स्वयंपाकघराच्या दाराशीं गेलें अन् तिथंच भिंतीला कान देऊन लक्षपूर्वक त्यांचं संभाषण ऐकूं लागलें.

त्यांचं सारं बोलणं माझ्या लग्नाविषयींच चाललं होतं. दोन हजार रुपये हुंडा देऊन दादांनीं तें स्थळ कायम केलं असल्याचं त्यांच्या बोलण्यावरून मला समजून आलं. माझ्या मस्तकांत घणाचे घाव बसत आहेत असा मला भास झाला, डोळ्यांवाटे अश्रू येऊं लागले. जास्त वेळ उभं राहवेना मला तिथं! मी झटकन् परत फिरलें.—

खोलींत आलें, दरवाजा लावून घेतला, वळकटी पसरली अन् त्यावर अंग टाकून दिलं. किती तरी वेळ मी रडत होतें. रडून रडून डोळे सुजून आले. अंथरुणाचा उशालगतचा भाग भिजून ओलाचिंब झाला.

अस्संच उठावं आणि 'मला इतक्यांत लग्न करायचं नाहीं असं' दादांना सांगावं असं फार फार वाटलं मला, पण माझी अन् चंद्रकांतांची मैत्री दृढ असल्याचें सर्वांनाच कळून आलें असल्यानें, माझ्या सांगण्यावरून कदाचित आमच्यांत—एकमेकांत झालेल्या वचनांची जाणीव होण्याचाच संभव जास्त असं वाटून मी तो विचार रद्द केला. मी उठलें अन् चंद्रकांताना पत्र लिहीलं.

"प्रिय चंद्रकांत—लाडक्या शशिकलेचा आपणांस सप्रेम नमस्कार—

आपण मला बोलावून घ्याल या आशेनीं कंठीं प्राण आणून मी आपल्या पत्राची वाट पाहिली, पण अद्यापिही आपलें 'तें' पत्र आलें नसल्यानें आज मला हें पत्र लिहीणें भाग झालें आहे.

दादा गांवांहून परत आले आहेत. दोन हजार रुपये हुंडा देण्याचें कबूल करून त्यांनीं स्थळ कायम केलें आहे असें मला त्यांच्याच बोलण्यावरून समजून आलें आहे. तिथि वगैरे निश्चित ठरली नाहीं, तरीपण या साऱ्या गोष्टी केव्हां ठरविल्या जातील अन् निश्चित होतील याचा कांहींच नेम नाहीं. तेव्हां हें पत्र पाहतांच तत्काळ मला बोलावून घेण्याचें करावें. मी इथून केव्हांच्या गाडीनें निघावं याचाही उल्लेख पत्रांत अवश्य करावा. म्हणजे स्टेशनवर मला घेण्यासाठीं आपल्याला येणें सुलभ अन् सोइस्कर होईल. कळावें.

आपलीच लाडकी

**शशिकला.**

पत्र बंद करून, तिकिट लावून तें टपालाच्या पेटींत टाकलं तेव्हांच माझ्या मनाला हायसं वाटलं.

   

## चंद्रकांतानें लिहीलेली हकीकत—

माझ्या स्नेह्यांचं—येथल्या बड्या हॉटेलच्या मालकाचं नांव दत्तात्रय होतं. त्यांना मी साऱ्या गोष्टी यापूर्वींच समजावून सांगितल्या होत्या. शशिकलेचं तें निकडीचं पत्र पाहिलं अन् ताबडतोब त्यांचा सल्ला घेण्यासाठीं मी तें पत्र घेऊन त्यांच्याकडे गेलों.

त्यांना तें पत्र दाखवलं. त्यांनीं वाचलं अन् उलट-"मग काय करणार आहेस आतां तूं? काय ठरविलं आहेस याबाबत तूं?" विचारलं.

"तेंच तर विचारण्यासाठीं मी तुमच्याकडे आलों आहे. सांगा मी यापुढें काय करावं तें?" मी त्यांना म्हणालों.

"मी काय सांगणार?-तूं ठरव काय हवं तें!" ते उत्तरले.

"मी तर ठरवतोंच आहे काय ठरवायचं तें-पण तुम्हाला काय वाटतं आहे हें तरी सांगाल कीं नाहीं?" मी त्यांना सवाल टाकला.

"यायला सांग तिला." ते अगदीं गंभीरपणें म्हणाले.

"याबाबत आपलं सहाय्य मला अखेरपर्यंत मिळेल ना?" मी त्यांना अत्यंत अधीरतेनें विचारलं.

त्यांच्याकडून होकार मिळतांच मला फार आनंद झाला अन् मी तत्काळ परत जाण्यासाठीं वळलों, पण त्यांनीं हांक मारली मला. मला थांबणंच भाग होतं. मी थांबलों.

चहा घेण्याचा त्यांनीं आग्रह केला अन् आग्रह करतांना त्यांनीं माझी खूप टिंगल-चेष्टा केली. मलाही ती त्यांची चेष्टा हर्षदायीच वाटली.

   

"प्रिय शशिकला—

तुझं निकडीचं पत्र पोहोचलं. वास्तवीक मी यापूर्वीच तुला बोलावून घेणं इष्ट होतं, पण येथल्या माझ्या सद्यस्थितीचा विचार

करतां मी इष्ट असूनही तुला कां बोलावून घेतलं नाहीं हें कळून येईल.

आतां हल्लींचे दिवस बरे चालले आहेत प्राप्तीच्या दृष्टीनें. आतां तुला इकडे निघून येण्याला कांहींच हरकत नाहीं.

"देव कीं दगड" कादंबरीची छपाई संपूर्ण झाली आहे. कादंबरी मी तुलाच अर्पण केली आहे. या आठवड्यांत कादंबरीच्या प्रती विक्रीसाठीं तयारही होतील. अर्पण पत्रिका अशी लिहीली आहे—

"इंदू दर्शनानें सिंधूला भरती येते, तद्वतच ज्या माझ्या प्रिय शशिकलेच्या वदनेंदु दर्शनानें मल्हत्सिंधूला भरती येते त्या माझ्या **प्रिय शशिकलेस सप्रेमार्पण.**"

कां, कशी आहे अर्पण पत्रिका ? बरी आहे ना ? तुला आवडेल असा मजकूर आहे हा—निदान मला तसं वाटतं. अस्तू.

हें पत्र पोहोंचतांच निघून येण्याची तयारी करावी. विलंब लावूं नये. तुला हें पत्र उदईक म्हणजे तारीख ++ रोजीं सकाळीं नऊचे सुमारास पोहोंचेल. आणि दुपारच्या चारच्या गाडीनें तेथून तूं प्रयाण करावेंस हें उत्तम. न सांगतां गुपचूपपणें निघून येणाराला रात्रीपेक्षां दिवसाचीच गाडी बिनधोक्याची असते अशी माझी पूर्ण खात्री आहे. तेव्हां, न चुकतां आणि न विलंब लावतां निघून यावें. मी स्टेशनवर येत आहेच. येथें स्पेशल खोली घेतली आहे. तेव्हां राहण्याची अडचण मुळींच नाहीं. येतांना सामानांचें भारूड बरोबर आणूं नये. सडेच यावे. तुला लागतील त्या सर्वच कपड्यांची व्यवस्था मी केली आहे. कळावे.

तुझा—

( काय लिहूं बरं आतां इथं ? 'आवडता' लिहूं, का 'प्रियकर' लिहूं ?–'प्रियकर'च लिहीतों झालं. )

प्रियकर

**चंद्रकांत.**

   

माझी वृत्ती आज अगदीं पूर्ण प्रसन्न होती. पोष्टाच्या पेटींत पत्र टाकलं, अन् नंतर तसाच पुढें महाराज बागेंत फिरायला गेलों. बागेंतल्या बाकावर किती तरी वेळ मी बसून राहीलों होतों. अखेरीस अंधार पडल्यावर माझी तंद्री उतरली. आळस वगैरे झाडून मी बाहेर पडलों.

भूक असूनही जेवावं असं वाटेना मला. खिशांत पैसे खुळखुळत होते. जेवणाशिवायच इतर जिनसा खाऊन भूक शमवावी असं वाटलं अन् म्हणून आधीं खानावळींत गेलों, तिथं खाडा मांडायला सांगितलं आणि नंतर इराण्याच्या हॉटेलांत शिरलों. चहा पावावर ताव मारला.

प्रसन्न मनानें परत फिरलों. कुलूप काढलं, खोलीचं दार उघडलं आणि कॉटवर अंग टाकून दिलं, पण झोंप येईना.

थोड्या वेळानं उठलों आणि अंगांत कपडे घालून बाहेर पडलों. तों थेट थिएटरचा रस्ता धरला. सिनेमा पाहण्याची हुक्की आली होती मला.

"रुक्मिणी स्वयंवर" या महान् पौराणिक बोलपटाचे खेळ चालू

होते. वरच्या विरोधाला न जुमानतां बेधडकपणें आपल्या प्रियकरा-करावरोबर पसार होणाऱ्या तेजस्वी रुक्मिणीची मूर्ति माझ्या मनश्चक्षूं-पुढें उभी राही अन् तत्क्षणीं शशिकलेच्या मनोधैर्याचा पुसटसा विचार अंतःपटलावर धक्का मारी. वाटे, रुक्मिणी इतकं मनोधैर्य माझ्या शशिकलेच्या अंगीं येईल कां ? वरच्या विरोधाला बेधडकपणें निधड्या छातीनें प्रतिकार शशिकला करूं शकेल कां ?—मी स्वतःशींच विचार करीत होतों.

रुक्मिणी, शशिकला अन् शशिकलेला पाठविल्या पत्रांतला मजकूर या त्रयींच्या विचारांनीं मला नीटशी झोंप सुद्धां आली नाहीं.

   

स्वप्नांत सुद्धां रुक्मिणी अन् शशिकला शेजारीं शेजारीं उभ्या आहेत असं दोन तीन वेळां दिसलं मला.

   

माझी शशिकला येणार या आनंदाचा बहर माझ्या अंतःकरणाची प्रसन्नता वृद्धिंगत करीत होता. हे दोन दिवस तर अतीशय आनंदांत गेले होते. आज पहांटेच्या गाडीनें शशिकला स्टेशनवर उतरणार ! तेवढ्यासाठीं मला स्टेशनवर जाणंच भाग आहे.

   

छे, शक्य नाहीं झोंप येणं ! शशिकला येणार आहे ना माझी पांचच्या गाडीनें, मग कशी झोंप येणार ?

तें स्टेशन, स्टेशनच्या आवारांत शिरणारी ती गाडी, गाडीचे ते

लाल डबे, आणि त्यांतून खिडकीबाहेर तोंड काढून उत्सुकतेनें पाहणारी ती शशिकला सारं सारं अगदीं स्पष्ट दिसत होतं मला.

ती डब्यांतून उतरते आहे, मी अत्यानंदानें हात पुढें केला आहे, हंसत हंसत ती माझ्याकडे अभिलाषित नजरेनीं पाहते आहे, किती तरी गमतीदार प्रसंग माझ्या मनश्चक्षूंसमोर उभे राहात अन् मन आनंदून जाई. निरनिराळ्या वेशभूषेंतली शशिकलाही दिसूं लागली मला.

निळ्या साडींतली अन् पांढऱ्या शुभ्र जंपरांतली शशिकला जशी सुंदर दिसे, तशीच पांढऱ्या शुभ्र साडींतली अन् जरीच्या बारीक किनारीचा पारव्या रंगाचा रेशमी जंपर घातलेली शशिकलाही सुंदरच दिसे. काळी चंद्रकळा नेसून, गुलाबी जंपर घालून अन् आपल्या भरदार बुचड्यावर बटमोगऱ्याची वेणी घालून पुढें आलेली शशिकला कांहीं कमी सुंदर दिसे असें मुळींच नाहीं. जरीच्या बारीक बारीक रेघांनीं विशेष खुलून दिसणारी भडक हिरव्या रंगाची साडी अन् तसल्याच प्रकारच्या कापडाचा ब्लाऊज घातलेल्या सुंदर शशिकलेची मूर्ति मला मोहवूं शकली नाहीं असं कधींच झालं नाहीं. सप्तरंगीं जॉर्जेटचं तलम पातळ आणि पोपटी रंगाचा, बिन बाह्याचा रेशमी व्हेस्ट घालून, पाठीवर वेणीचा शेपटा आणि शेपट्याच्या टोंकाला कौशल्यपूर्वक बनवलेला लहानसाच पण गोल झुबकेदार फुलांचा गोंडा बांधून हंसत मुखानें आणि नाचऱ्या नजरेनीं माझ्याकडे टक लावून पाहणाऱ्या शशिकलेच्या पूर्णेंदुवत् मोहक मुखमंडलाकडे

अत्यंत अतृप्त नजरेंनीं एकसारखं पाहण्याचा मोह मला आवरत नसे सहसा. अशा अतृप्त अन् अधाशी नजरेंनीं तिच्याकडे पाहतांना मी माझ्या मनाशीं—

"का हिचियावरती जीव हा मोहुनिया गेला?
प्रश्न कशाला हा? जगानें इंदु कधीं त्यजिला?"

या ओळी गुणगुणत असे. वेणीच्या चक्रावर शेवंती आणि कृष्ण-कमळमिश्रित सपर्ण फुलांची वेणी घालून आणि जरीच्या बारीक बारीक ठिपक्यांची फिकट पिवळ्या रंगाची साडी व त्यावर खुलून दिसणारा जरीच्या कलापूर्ण भरतकामांनीं विशेष विलसविलेला निळ्या रंगाचा ब्लाऊज घालून रस्त्यानें जाणाऱ्या गजगामिनी शशिकलेच्या पाठमोऱ्या आकृतिकडे मंत्रमुग्धतेनें मी पाहात राही. अशावेळीं—

"पथिं चालतां पडतीं तुझी किति सन्थ कोमल पाऊलें!
जन मागुनी पुढुनी तुला मुरडून देखत राहिले.
फिरतेस तूं भरल्या पथीं—चुकतेस तूं मुळिं हेंच कीं—
जनदृष्टी ना कधिं सारखी, कुणि घातकी, कुणि पातकी ॥"

हें चरण हमखास आठवत असत.

चुंबनासाठीं हापापलेल्या अन् अधीर झालेल्या ओष्ठांचं समाधान करण्याच्या हेतूनें प्रेयसीजवळ जावं आणि त्यावेळीं तिनं "कुणीतरी येईल ना? हें काय बाई भलतंच! इश्श!" असं म्हणून आढेवेढे घ्यावेत अशावेळीं जी उत्कंठा वाढते अन् त्यांत जी अनुपमेय व अवर्णनीय लज्जत सांठलेली असते याची यथार्थ कल्पना ज्यांनीं या

स्थितीचा अनुभव घेतला आहे त्यांनाच येईल. उगाच नाहीं माधव ज्यूलिअननीं या स्थितीवर काव्य केलं—

"जशी तूं दाविशी भीती, तशी ही वाढते प्रीती—
'नको' चा अर्थ 'हो' ऐसा मजेचा बायकी कावा."

   

पहांटे चार वाजतांच उठलों मी अन् शशिकलेच्या स्वागतासाठीं स्टेशनवर गेलों. गाडी पांच वाजतां येणार, पण शशिकलेच्या भेटीसाठीं मी इतका अधीर झालों होतों, कीं पांच वाजतां गाडी येणार हें माहीत असूनही मी इतक्या लवकर स्टेशनवर गेलों होतों. स्टेशनच्या आवारांत पाय ठेवला मी—प्लॅटफॉर्मवर एकही गाडी नव्हती. सारा शुकशुकाट! वेटिंगरूममध्यें कांहीं उतारू झोंपले होते. एकादाच उतारू एकटाच प्लॅटफॉर्मवरून फिरतांना दिसे, तर नुक्तीच एक गाडी गेली असल्यानें गाड्यावरून विक्री करणारे फेरीवाले एकमेकांशीं गुलगुल बोलत असल्याचें दिसे! भयाण रात्रीं स्मशानांत बहुतेक जळून गेलेल्या चितेंतला निखारा ज्याप्रमाणें पाहाणाराच्या मनाला भेसूरपणें भेडसावतो, त्याचप्रमाणें अतीशय लांब असलेल्या एंजिनमधल्या निखाऱ्याकडे पाहून माझ्याही मनाला भेसूर भयानकता भासली.

पहांटेचा गार आर्द्र वारा अंगाला झोंबत होता. अत्यंत अधीरतेनें प्रियेला कवटाळून तिच्यावर चुंबनाचा अधाशीपणें वर्षाव करणाऱ्या भावनाविवश तरुणाप्रमाणें वाराही सृष्टीच्या सर्वांगाचं अधाशी-पणानें कडकडून दीर्घ चुंबन घेत होता. याचवेळीं क्षणमात्र

पावसाची लहानशी सर सरसरली! प्रदीर्घ कालानें भेटलेल्या प्रियकराच्या आलिंगन स्पर्शानें, गालांवरून ओघळलेल्या आनंदाश्रूंच्या सरींनीं, आधींच सुंदर असलेलें रमणीचें मुखकमल प्रसन्नतेच्या दाट छायेनें व्याप्त झाल्यामुळें जास्तच सुंदर दिसावें अन् मन सानंद बेहोष व्हावें, तद्वत् त्यावेळीं पावसाच्या लहानशा सरींनीं ओथंबलेल्या सृष्टीकडे पाहून मला वाटलं. वाऱ्याची एक जोराची लाट अंगाला झोंबून गेली. त्या लाटेमुळें झाडांच्या फांद्या हालल्या, एकमेकांच्या घर्षणानें त्यांतून 'सळ्सळ्' आवाज निर्माण झाला, झाडांवरील घरट्यांत निर्भयपणें विश्रांति घेणारे पक्षी घाबरून पंख फडफडवीत अन् 'चीं चीं' आवाज करीत बाहेर पडलीं. अनुरक्त असतांही, अवेळीं लगट करणाऱ्या प्रियकराच्या कृतीचा प्रतिकार करणाऱ्या मोहिनीच्या हस्त-कंकणाचा आवाज,—प्रतिकार क्रियेच्या वेळीं सहजपणें इकडून तिकडे होते वेळीं फडफडणाऱ्या पातळाचा फडफड आवाज आणि प्रतिकारदर्शक निघालेल्या त्या मोहिनीच्या नाजूक कंठांतील तो कर्णमधूर शब्दोच्चार! या साऱ्यांची आठवण माझ्या मनास अत्यंत तीव्रतेनें, त्या वाऱ्याच्या एकाच लाटेनें निर्माण झालेल्या आजूबाजूच्या परिस्थितीच्या अवलोकनानें झाली.

एका रुळावरून दुसऱ्या रुळावर जाणाऱ्या गाडीचा खाड्खाड् आवाज कर्णरंध्रांत घुमत होता. प्लॅटफॉर्मवर परगांवीं जाणाऱ्या प्रवाशांची, आणि माझ्यासारख्याच आणखी कांहीं माणसांची धांदल उडत होती. गाडीचा वेगही पूर्ण ओसरला नाहीं तोंच, "चाय्

गरमSSSम! टाSSईSSम्स्, क्रॉSSनिकSSल्! पान विडी मॅचिSS स'' च्या कर्णकर्कश आरोळ्यांनीं सारें स्टेशन दुमदुमून गेलें. ''लालबावटा'' संघाचा चिटणीसही आपल्या मिरवणुकीपुढें हातांत लालबावटा घेऊन दक्षतेनें उभा राहणार नाहीं, तितक्या दक्षतेनें हातांत लालबावटा घेऊन लांब असलेल्या सिग्नलजवळ उभ्या असलेल्या रेल्वे पोर्टरचं कौतुक वाटलं मला.

गाडी थांबली! साध्या लहानशा धक्यानें मोहोळांतल्या माशा पटापट उडाव्यात, तद्वत गाडींतले उतारू पटापट खालीं उतरत होते. शाळा सुटल्यानंतर घरीं परत येणाऱ्या लहान मुलांच्या चेहऱ्यावरील निर्विकल्प आनंदाचा भाव स्पष्ट दृग्गोचर व्हावा, तद्वत् कांहीं प्रवाशांच्या चेहऱ्यावर निर्विकल्प आनंदाचा भाव स्पष्ट दृग्गोचर होत होता. अन् नुक्तेंच प्रेतयात्रा आटोपून परत आलेल्या माणसांच्या सुतकी चर्येवरील भावांशीं कांहीं प्रवाशांच्या चर्येवरील भावही विलक्षण साम्य दर्शवीत होता. या परस्पर विरुद्ध भावावलोकनानें माझ्या अंतःकरणाला कांहींएका निराळ्याच प्रकारच्या विलक्षण अपूर्ततेची, असमाधानाची, उद्विग्नतेची, आणि खिन्नतेची जाणीव झाली.

मी अधीरतेनें चहूंकडे दृष्टी फेंकली. मी गांगरून गेलों. शशिकला कुठेंच दिसेना मला. अगदीं पहिल्या डब्यापासून तों अखेरच्या गार्डाच्या डब्यांपर्यंतचे सारे डबे धुंडाळले. पण निराशा.

जड पावलानें अन् खिन्न मनानें मी परतलों.

## प्रकरण १२ वें–मादक मीलन.

कदाचित् गाडी चुकली असेल असं वाटून मी दुपारीं १२॥ चे गाडीसाठीं पुन्हा स्टेशनवर गेलों. पण–पण–याहीवेळीं शशिकला आली नाहीं.

मी पुन्हा सायंकाळीं सव्वासात वाजतां स्टेशनवर गेलों–पण—!

शशिकलेची गाडी चुकली असेल हा केवळ माझ्या मनाचा तर्क होता. तिकडे खरी स्थिति काय घडून आली आहे, हें कळायला मला कांहींच मार्ग नव्हता. मी पाठवलेलं पत्र दुसऱ्या कुणाच्या तरी हातीं पडलं नसेल? असाही मी तर्क केला–पण अखेर निश्चित निर्णय असा कांहींच लागेना.

   

या पांचसहा दिवसांत माझ्या मनाची बेचैन वाढली. मला कांहींच सुचेनासं झालं आहे. दररोज येणाऱ्या प्रत्येक गाडीच्या वेळीं मी अत्यंत उत्सुकतेनें स्टेशनवर जाई. अन् जितक्या उत्सुकतेनें जाई, तितक्याच खिन्न अन् उदास मनानें परत येई.

रात्रींचा एक वाजला होता. मी स्टेशनवर मोठ्या उत्सुकतेनें गेलों होतों. गाडी खाड्खाड् करीत आली आणि खाड्खाड् करीत गेली. माझी प्रियतमा–शशिकला नव्हती त्या गाडींत.

मी खिन्न अन् उदास मनानें परत फिरलों. स्टेशनवर जाण्याचा अन् परत फिरण्याचा माझा रस्ता एकच होता. या इतक्या दिवसांत

मी कधींच रस्ता बदलला नव्हता. आजही त्याच रस्त्यानें मी परत फिरलों. स्टेशनची हद्दी ओलांडून गांवाच्या रस्त्याला लागलों होतों मी. कांहींसा चालून गेलों असेन, तितक्यांत बराच वेळ नाहींशा झालेल्या आईच्या भेटीसाठीं लहान अर्भक उत्सुक व्हावं अन् आईला पाहतांच त्यानें झटकन् मोठ्या आवेशानें आईकडे झेंप टाकावी, तद्वत सृष्टी-देवीकडे मेघराजानें एकदम मोठ्या आवेशानें झेंप टाकली होती. मी तर पूर्ण भिजून ओला चिंब झालों होतों. त्या तशा मुसळधार पावसांत पुढें चालणं अशक्य होतं. आणि जवळपास तांगाही कुठें दिसेना. अखेरीला कुठेंतरी उभं राहावं असा विचार केला. रस्त्याच्या दुतर्फा युरोपियन लोकांचे बंगले होते—शिरलों एका बंगल्यांत आणि कमानी-खालीं उभा राहिलों मी.

पांचच मिनिटें झालीं असतील मला तिथं उभं राहून! तितक्यांत त्या बंगल्याच्या मालकाचा बेअरर छत्री घेऊन माझ्याकडे आला आणि बोलावलें असल्याचें सांगूं लागला!

कशाला बोलावलं असेल याचा क्षणभर विचार पडला मला—पण तो फार वेळ टिकला नाहीं—गेलों आंत मी त्या बेअररबरोबर?

पहिल्याच दालनांत एक साधारण पोक्त वयाची स्त्री आणि दुसरी तारुण्याच्या पायरीवर नुकतेंच जिनें पाऊल ठेवलें आहे अशी अठरावीस वर्षांची मुलगी गोलमेजाभोंवतीं बसून पत्ते खेळत होती. ती मुलगी एकटीच 'पेशन' चा डाव मांडून खेळत होती, आणि त्या स्त्रीच्या हातांत एका इंग्रजी मासिकाचा अंक होता.

माझ्याकडे दोघींनींही दृष्टीक्षेप फेंकला. अन् तितक्यांतच क्षणाचाही विलंब न लावतां ती तरुण मुलगी उठली आणि आंत गेली, थोड्या वेळानें बाहेर आली आणि शुद्ध हिंदींत आंतल्या दालनांत जाऊन कपडे बदलण्याविषयीं मला सांगूं लागली.

हंसत हंसत हस्तांदोलन केलं आणि निशंःकपणें आंतल्या दाल-नांत ओले कपडे काढण्यासाठीं गेलों. आधुनिक फॅशनचं तिथच्या ठिकाणचं तें युरोपियन अप्-टु-डेट पद्धतिचं सामान पाहून मन प्रसन्न झालं आणि तिथल्या एकंदर टापटिपीविषयीं खात्री झाली.

कपडे बदलून मी बाहेर आलों. बेअररला हांक मारून माझे ओले कपडे पिळून सुकायला टाकण्यासाठीं तिनें इंग्लिश भाषेंतून सांगितलें. आणि एका प्रशस्त झुलत्या खुर्चीकडे बोट करून मला बसण्याबद्दल खुणावलें. खुणावल्या ठिकाणीं मी बसलों.

एक सिगार तिनें पुढें केला. मी आजपर्यंत कधींच धूम्रपान केलं नसल्यानें तो सिगार स्वीकारावा किंवा नाहीं याबद्दल क्षणभर मला पेंच पडला. वासावरूनच्च तो अस्सल उंची सिगार होता याची जाणीव झाली मला. पण—पण!!! नम्रपणें मी नकार दर्शविला.

कांहींवेळ इंग्लिशमध्यें तर काहींवेळ हिंदीमध्यें आमचं संभाषण चालूं होतं. तिनें माझी विचारपूस केली, मीही सर्व माहिती तिला सांगितली. मी लेखक आहे हें ऐकून तिची उत्सुकता वाढली. अन् मैत्री दृढ व्हावी असा हेतू तिनें प्रकट केला.

कॉफी घेतल्या नंतर मी घरीं परत जाण्याला निघालों. त्या मुलीनें

आपला स्वत:चा रेनकोट आणून दिला आणि बेअररकडून सायकल बाहेर काढवली. फाटकापर्यंत माझा हात धरून ती आली—मी कृतज्ञतेनें तिचे आभार मानले अन् सायकलवर टांग टाकली.

   

कादंबरीची एक प्रत घेऊन तिची सायकल अन् रेनकोट परत देण्यासाठीं मी तिच्या बंगल्यावर गेलों. कादंबरीची प्रत तिच्यापुढें ठेवली. तिनें झटकन् उचलून घेतली अन् भराभर पानें चाळण्यास सुरवात केली. थोड्या वेळानें मी उठलों, अंगावरील कपडे बदलण्याची इच्छा दर्शविली. आंतल्या दालनांत जाण्यास सांगितलें. मी आंतल्या दालनांत गेलों. कपडे काढले, माझे सुकलेले कपडे घालून बाहेर आलों आणि कोचावर बसलों.

ती पोक्त स्त्री त्या मुलीची मावशी होती. त्या मुलीला आई वडील कुणीच नव्हते. ही नुक्तीच जन्मली होती त्यावेळीं तिचे वडील महायुद्धावर सैनिक म्हणून गेले होते, आणि आई एका दवाखान्यांत नर्सचे कामावर होती असें त्यांच्या बोलण्यावरून मला समजलें. तिच्या मावशीचा पती लष्करी खात्यांत बड्या हुद्याच्या जागेवर असून लष्कराबरोबर परगांवीं गेला असल्याचेंही कळून आलें.

फार मोकळ्या स्वभावाची होती ती मुलगी, आणि बोलकीही फार होती. या घराण्याची ओळख होणं म्हणजे योगायोगच होता! त्या मुलीचं नांव निना होतं. फार गोड भाषेंत तिनें आपली सारी हकीकत सांगितली. मीही मधून मधून बोलत होतोंच. बोलत अस-

तांनाच तिनें आपलें कपाट खुलें केलें. त्यांतल्या साऱ्या सुंदर वस्तू बाहेर काढल्या. व्हायोलीन काढलें आणि एक इंग्लिश पद वाजविण्यास सुरवात केली. हळूहळूं तिच्या मुखांतून त्या पदाचे शब्दोच्चारही बाहेर पडूं लागले. फोनोवर मी आजपर्यंत अनेकदां इंग्लिश संगीताचा आस्वाद घेतला होता, पण प्रत्यक्ष इंग्लिश संगीत ऐकण्याचा तो पहिलाच योग होता. गात असतांना तिच्या शरिराची ती विशिष्ट मोहक हालचाल, सकंप स्फुरणारे तिचे ओष्टद्वय आणि तिनें सहजपणेंच मधून मधून मजकडे फेंकलेल्या दृष्टिक्षेपांकडे पाहून—पौर्णिमेच्या आल्हाद-कारक सुषमांची प्रसन्नताच माझ्या वृत्तींतून, साऱ्या नसां-नसांतून ओथंबली आहे असा भास झाला मला !—व्हायोलीनवर तिचा हात फारच सफाईनें चालत होता. तिनें म्हटल्यापैकीं मला कांहींएक कळलं नाहीं. मी नुसता मंत्रमुग्धतेनं तें सारं ऐकत होतों. शेलेचं तें एक उत्कृष्ट प्रेमगीत होतं हें निनानेंच मला जेव्हां सांगितलं तेव्हां मी तिच्याकडून पुन्हां तें म्हणवून घेतलं. मी आतां मात्र अगदीं लक्षपूर्वक ऐकूं लागलों. ती अगदीं मला खेटून बसली होती. तिच्या स्पर्शानें माझ्या सर्वांगावर रोमांच उठत आणि शशिकलेची आठवण होई. त्या आठवणीसरशीं माझ्या नेत्रांत पाणी थरारलं. आणि त्या ओलसर पापण्यांमधून दिसणाऱ्या पलीकडील अस्पष्ट दृश्यांत निनाच शशि-कलेच्या स्वरूपांत मला दिसूं लागली. मी अगदीं पूर्ण एकाग्रतेनें डोळ्यांच्या ओलसर कडा न पुसतां तसाच तिच्याकडे पाहात राहिलों. मी भान हरपून गुंग झालों होतों. माझी तंद्री लागली होती. तिनें

व्हायोलिन बंद केलेलंही कळलं नाहीं मला त्या तंद्रींत.

माझ्या डोक्यावरील कुरळ्या केसांवरून तिनें हात फिरवला. माझी तंद्री एकदम खाडकन् उतरली. डोळ्यांवरील धुंदी नाहींशी झाली. माझ्या केसाला झालेल्या तिच्या हस्तस्पर्शानें मी भानावर आलों. शशिकलेच्या स्मृतीचा तीव्र अन् जोराचा झटका माझ्या अंत:करणाला बसला. मीं कोचावरून उठलों, तिचे हात हातांत घेतले अन् पुन्हां ते लगेच तसेंच सोडून झटक्यानें दालनाबाहेर गेलों.

पुन्हां दुसऱ्या दिवशीं असाच दुपारीं येईन असं आश्वासन तिला दिलं अन् रस्ता गांठला मी!

माझं मन ठिकाणावर नव्हतं त्यावेळीं. रस्त्यावरील हालचालीकडे माझं बिलकूल लक्ष नव्हतं. माझ्या मस्तकांत किडे घुमत आहेत असं वाटलं. घणाचे घाव मस्तकांत मधून मधून बसत आहेत असंही वाटून वेदना असह्य झाल्या. मी खोलीवर आलों अन् दार लावून घेऊन आयत्याच पसरून ठेवलेल्या दत्तोपंतांच्या बिछान्यावर अंग टाकून दिलं.

स्त्रीचा नुसता स्पर्शही अत्यंत उन्मादकारी असतो याची मला आज पहिल्यानेंच, पण तीव्र जाणीव झाली. निनाच्या हस्तस्पर्शा-बरोबर माझ्या शरिराच्या साऱ्या गात्रांमधून एक निराळीच विलक्षण प्रकारची चमक चमकून गेली. कांहीं क्षण वृत्ती बधीर होऊन गेल्या होत्या.

शशिकलेच्या स्मृतीनं माझं मन व्याप्त झालं होतं. शशिकलेची

आणि माझी मैत्री दृढ झाल्यापासून तें परवांच्या त्या स्टेशनवरील शेवटच्या भेटीपर्यंतचे तिच्या सान्निध्यांत घालवलेले सारे क्षण मला आठवले. मनाच्या केंद्रस्थानीं त्या सर्व स्मृतींची गर्दी झाली, सर्वत्र बजबजपुरी माजली अन् त्यांत स्मृतीपासून होणाऱ्या असह्य वेदनांचाच हलकल्लोल जास्त उफाळला.

शशिकलेच्या अंगस्पर्शाचा हर्षदायी अन् कांहींसा उन्मादी अनुभव मला यापूर्वींच किती तरी वेळां मिळाला होता, पण आजच्या निनाच्या अंगस्पर्शांत त्यापेक्षां जास्त उन्माद दाटल्याची जाणीव झाली मला; मी बेहोष झालों होतों त्या भरांत.

निनाच्या अंगस्पर्शानें निर्माण झालेल्या उन्मादाच्या बुडाशीं माझ्या मनांत निनाविषयीं अभिलाषा उत्पन्न झाली कीं काय, याचा पूर्ण निर्णय अद्यापिही मला लागलेला नाहीं. फार विचार केला मी यावर! मेंदूला अती ताण दिला मी—पण छे—निर्णयच होत नाहीं कांहीं. एवढं मात्र खरं, कीं त्या उन्मादाच्या क्षणीं 'हाच स्पर्श माझ्या शशिकलेचा असता तर?' या भावनेची तीव्र जाणीव झाल्यावांचून राहिली नाहीं माझ्या मनाला.

   

आज नारळी पौर्णिमा! बहीणीनें भावाच्या दंडांत राखी बांधायची असते म्हणे आज. दंडाला राखी बांधून हौसेनें अन् नव्या उत्साहानें जाणाऱ्या प्रौढ मुलांकडे पाहून माझ्या अंतःकरणाला धक्का बसला! मला माझ्या बहीणीची—ताईची आठवण झाली. त्या

आठवणीनें जीव व्याकळून गेला माझा! तात्पुरतें मनाचें समाधान करण्याच्या हेतूनें मी एक राखी विकत घेतली अन् बांधली दंडांत.

तात्पुरत्या समाधानासाठीं मी दंडांत राखी बांधली ही गोष्ट खरी; पण त्यायोगानें तात्पुरतें समाधान तर नाहींच लाभलें, उलट वियो- गाचें दुःख दुणावलें जास्त! राखी बांधून प्रसन्न मुद्रेनें हिंडणाऱ्या त्या मुलांकडे पाहून त्यांच्या दंडांत त्यांच्या बहिणींनेंच राखी बांधली असेल नाहीं? असं वाटून मन उद्विग्न झालं! मी माझ्या प्रीय ताई- कडे असतो तर? तर, मीही तितक्याच प्रसन्न मुद्रेनें राखी बांधून मिरवलों नसतों कां?—

मी मग शशिकलेच्या घरीं भेटीला गेलों असतों, तिला मोठ्या अभिमानानें दंडातली राखी दाखवली असती, अन्....अन्.....

मस्तकांत उठलेली विचारांची वावटळ होती ती! इथं ताईही नव्हती, आणि शशिकलाही नव्हती.

   

माझं पत्रच पोहोंचलं नसेल असा विचार करून मी दुसरं एक पत्र शशिकलेला पाठवलं.

पत्र लिहून झाल्यानंतर पोष्टांत टाकण्यासाठीं मी उठलों, कपडे घातले अन् बाहेर पडलों—आतां दार ओढून घेऊन खोली बंद करणार इतक्यांत जिन्यावरून धाड धाड पाय वाजवीत वर येऊन माझ्या- जवळ उभ्या राहणाऱ्या निनाकडे लक्ष गेलं माझं!

निनाला पाहून स्तिमितच झालों मी क्षणभर. मी जरी तिला

माझ्या राहत्या खोलीचा पत्ता दिला असला, तरी तो शोधीत शोधीत माझ्याकडे येण्याची तिची प्रवृत्ती बळावली जाणार नाहीं असंच मला निनाला पत्ता लिहून देतांना वाटलं !

तिला पाहून एका इंग्लिश कादंबरीच्या संपूर्ण कथानकाची स्मृति झाली मला. त्या कादंबरींतल्या नायिकेचेंही नांव निनाच होतें. रिएन्झीच्या प्रेमपाशांत सांपडलेल्या त्या निनाच्या आठवणीबरोबर माझ्या हृदयांत कांहीं क्षण हर्षोत्फुल्ल ऊर्मि उसळल्याविना राहिल्या नाहींत.

मी खोलीचं दार उघडलं आणि स्वागतपूर्वक गोड शब्दांत तिला आंत येण्याला सूचना दिली.

माझ्या दारिद्र्याची तीव्रतेनें जाणीव झाली मला त्यावेळीं. माझ्या त्या छोट्याशा खोलींत टेबल नव्हता, कीं खुर्चीही नव्हती. माझी बॅग कॉटखालीं पडलेली होती. एका कोपऱ्यांत पाण्यानें भरलेलं एक बकेट होतं, काठीवर माझे कांहीं ओले कपडे होते. कॉटवर बेडिंग अव्यवस्थितपणें गुंडाळून ठेवलेलं होतं.

"निना, गरीबाचं विश्रांतीस्थान आहे हें. या ठिकाणीं तुला बसायला तुझ्या घरच्यासारखं आधुनिक सुखसोयींनीं भरलेलं फर्निचर दिसणार सुद्धां नाहीं." मी तिला म्हणालों.—

माझे उद्गार ऐकून ती नुसती हंसली. तिच्या त्या निर्विकल्प, निर्विकार हास्यानें माझ्या मनावरील संकोचाचें बरेंचसें दडपण कमी झालें. ती आली आणि सरळ माझ्या कॉटवर जाऊन बसली.

अगदींच ओळख नसतांही तिनें सहानुभूतीनें केलेल्या पहिल्या

दिवशींच्या स्वागताची आठवण झाली, अन् आतां यावेळींही तिचं स्वागत उत्कृष्टपणें आपल्या हांतून व्हावं असं वाटलं. मी तिला विचारलं—"काय घेणार तूं? चहा, कॉफी कीं दुसरं थंड पेय?"

प्रथम तिनें कांहींच घ्यायचं नाहीं असा भाव दर्शविला. परंतु माझ्या अती आग्रहानें तिनें फक्त कॉफी घ्यायचं ठरविलं.

"आलोंच हं आत्तां—" असं म्हणून मी खालीं गेलों--जवळच्याच एका मोठ्या हॉटेलांतून दोन कप कॉफीची आणि चार केक्स्ची ऑर्डर देऊन पुन्हा वर आलों.

कॉफी घेतांना निना मला उद्देशून म्हणालीच "कसा रे राहतोस एवढ्या खोलींत तूं? येणार का आमच्या बंगल्यावर राहायला? चल ना—दे सोडून ही खोली तूं!"

काय बोलणार मी यावर! मी नकार दर्शवितांच तिला फार वाईट वाटलं. अन् निदान दोन दिवस तरी बंगल्यावर राहायला येच असा तिनें आपला आग्रह चालू ठेवला.

दोन दिवस राहायला जाण्याचं मी कबूल केलं.

तीन चार दिवस मी तिच्याकडे गेलों नव्हतों या बद्दलही तिनें माझी गोड शब्दांत खूप हजेरी घेतली.

कॉफी घेतल्यानंतर मी कपडे घातले—तीही उठली—खोलीचं दार बंद करून कुलूप लावलं अन् जिना उतरून आम्ही दोघेही खालीं आलों. जिन्यावरून उतरतांना निनानें माझा हात धरला होता. तिच्या त्या लांब सडक, गार नाजूक बोटांच्या स्पर्शानें माझ्या

हृत्कासांत अननुभूत संवेदनांच्या वीचि उसळल्या. चाळींतील इतर लोक आम्हांकडे साश्चर्यभरित नजरेनीं पाहात आहेत हें मला समजून आल्याविना राहिलें नाहीं.

निनानें मोटारसायकल आणली होती. खालीं आल्यानंतर ड्राईव्ह-करायला बसणार कां ? असा तिनें मला प्रश्न विचारला. त्यावर मला ड्राईव्ह करतां येत नाहीं असं तिला स्पष्ट सांगितलं मी.

निर्भयपणानें रस्त्यावरील गर्दींतून वेगानें मोटरसायकल हांकण्याचें निनाचें कौशल्य पाहून माझ्या मनांत तिच्याविषयीं कांहींसा आदर आणि कौतुकही निर्माण झालें.

यापूर्वी कुठल्याच समवयस्क तरुणाचें साहचर्य निनाला लाभलें नव्हतें. अत्यंत हापापलेल्या अन् अधाशी वृत्तीनें ती माझ्या सान्नि-ध्यांतील सहवाससुखाचा आस्वाद घेत होती. आपल्या संग्रहीं असलेल्या साऱ्या साऱ्या हृद्य आणि सुंदर वस्तू तिनें मला दाखवल्या बागेंतूनही कांहींवेळ हिंडवलं मला. डेलिआच्या गोल झुबकेदार फुलांचं विलक्षण वेड होतं तिला. त्या गेंदबाज फुलांना हातांत धरण्यांत तिला अतोनात हर्ष होई.

निरनिराळ्या इंग्लिश मासिकांतील प्रेमकथा वाचून आपणही कुणातरी तरुणावर प्रेम करावं, आपल्याही आयुष्यांत अशाच कांहीं चमत्कारिक घटना घडून याव्यात असं तिला फार फार वाटे. मासिकांतल्या तरुणाच्या फोटोवरही तिनें प्रेमपत्रांचा वर्षाव केलेला होता. या साऱ्या मनांतल्या खळबळी तिनें मला मोकळेपणानें न

संकोचतां सांगितल्या. फोटोकडे पाहून लिहीलेलीं प्रेमपत्रेंही तिनें मला वाचण्यासाठीं दिलीं. आणि——

"तूं लेखक आहेस ना ? मग कर माझ्या या मनःस्थितीचं वर्णन तूं आपल्या पुढील पुस्तकांत !" ती मला म्हणाली.

वासना–विकांरांनीं ओतप्रोत भरलेल्या तिच्या भावनाप्रबल मनःस्थितीकडे पाहून क्षणभर मला गम्मत वाटली तिची.

खऱ्या प्रणयाची तिच्या मनाला नीटशी जाणीव देखील झाली नसून केवळ एक वाचनाचा तीव्र परिणाम तिच्या भावनाविवश मनावर झालेला आहे याची स्पष्ट जाणीव झाली मला. अन् कांहींशा कुतूहलतेनें तिच्याकडे पाहात राहिलों.

माझ्या मैत्रीविषयीं निनाच्या मावशीनेंही समाधान व्यक्त केलें.

   

पौर्णिमेचें पांढरेंशुभ्र धवल चांदणें, बागेतील आजूबाजूंचें सुगंधी लहरींनीं दरवळून राहिलेले उन्मादी वातावरण अन् त्या ठिकाणीं आमच्या भोजनाची व्यवस्था केलेली! त्या वातावरणाचा माझ्या भावनाप्रधान मनावर परिणाम झाला. अनिर्वचनीय उन्माद माझ्या साऱ्या वृत्तींतून–नसानसांतून थयथयत होता–मी अगदीं बेहोष झालों होतों.

मांसाहारी खाद्यांचें सेवन आज प्रथम केलें मी !

कांहींसुद्धां शिसारी आली नाहीं मला त्या खाद्यांची. मुद्दाम बाहेरून मागविलेल्या आईस्क्रीमच्या बशा, ते पावाचे मोठे तुकडे, ती

टमॅटोची जेली, तो चिकूचा जॅम, मटणाचा रस्सा, केक्स्नीं भरलेल्या बशा, भाताची मोठी थाळी, ते तळलेले मासे, आमलेट, पॅटिस—किती-तरी पदार्थांची रेलचेल होती.

आणि—आणि—मद्याची बाटली व पेले——

प्रथम लक्षच गेलं नाहीं माझं त्या बाटलीकडे आणि पेल्यांकडे—! अर्धेनिम्मे खाणें झाल्यावर जेव्हां माझं त्याकडे लक्ष गेलं तेव्हां माझ्या सर्व शरिरावर कांटा उभा राहिला तत्क्षणीं !

ते काटे, चमचे, सुऱ्या—जेवणाचा अगदीं नवीन थाट होता. मी कधींच त्या नव्या साधनांच्या सहाय्यानें जेवण केलं नव्हतं. निना आणि तिची मावशी या साऱ्या साधनांच्या सहाय्यानें पटापट हवा असलेला जिन्नस उचलून घेऊन तोंडांत टाकीत. तळलेल्या माशांचा तर फन्ना उडविला त्या दोघींनीं ! मलाही आग्रह केला त्याचा;—"समुद्रांतले नाहींत बरं हे मासे; नदींतले आहेत हे—समुद्रांतल्यापेक्षां नदींतल्या माशांना जास्त चव असते. पहा तरी खाऊन—" निना मला आग्रह करीत होती.

"मद्य घेणार का?" मद्याचे पेले भरीत-भरीत निनाच्या मावशीनीं मला विचारलं. त्यांचा तो प्रश्न ऐकून माझ्या सर्वांगावर शहारे उभे राहिले. "घाबरून जाण्याचं कांहीं कारण नाहीं. आणि व्यसन लागेल अशी समजूत करून नको आहे घ्यायला. फारच उंची आणि मधूर आहे हें मद्य—पहा तरी घेऊन—" मावशी मला म्हणाल्या.

मावशीच्या जोडीला निनानेंही आग्रह करण्यास सुरवात केली अन् त्या आग्रहाबरोबरच तिनें माझ्यापुढें एक पेला ठेवलाही!

'नको' म्हणणं अगदीं ओठांवर आलं असूनही, 'नको' म्हणण्याचा धीर झाला नाहीं मला. माझ्या वृत्ती अगदीं उन्मादून गेल्या होत्या. त्या पूर्ण बेहोष झाल्या! माझा ताबा माझ्या वृत्तीवर विशेषसा राहिला नव्हता त्यावेळीं! त्यावेळच्या मोहक अन् आल्हादी वातावरणानें माझ्या मनःस्थितीवर अनिर्वचनीय, अनुपमेय उन्मादाचीं पुटें चढलीं होतीं.

निनानें पुढें केलेला तो मद्याचा पेला मी उचलला अन् ओठांशीं लावला. माझ्या साऱ्या शरिराच्या वृत्ती गार, सुखद्, उन्मादी लहरींनीं बहरून गेल्या.

   

"The first love is the only love, and by the second the highest sense of love is already lost."

गटेच्या या वाक्याची सत्यता पटली मला.

स्टेशनवरील चाळींत शशिकलेच्या मीलनाचा आस्वाद मी घेतला होता. त्यावेळीं त्या मीलनप्रसंगीं मी पूर्ण बेहोष होतो. तें माझ्या संबंध आयुष्यांतील पहिलेंच मीलन होतें. शशिकलेवरील माझ्या आसक्तीची तृप्ती झाली होती. पण मी भानावर नव्हतों त्यावेळीं. भुकेनीं व्याकूल झालेलें अर्भक स्तनपानाच्यावेळीं आनंदानें बेहोष होतें. तल्लीन होऊन स्तनपानाच्या आनंदाचा आस्वाद घेते—तद्वतच आनं-

दाच्या भरांत बेहोष होऊन अती तल्लीनतेनें मी त्या प्रथम मीलनाचा उन्मादून उपभोग घेतला होता. पहिली ओळख, पहिला स्पर्श, पहिलें चुंबन, पहिलें मीलन—और मादक-मधुरता सांठलेली असते या सर्वांत. या सर्व गोष्टी पुन्हां अनुभवितांना पहिल्या आनंदाची गोडी शिल्लक राहिलेली नसते. दुसऱ्या स्पर्शांत—दुसऱ्या चुंबनांत—दुसऱ्या मीलनांत—छे—मधुरता पूर्ण लोपलेली असते; आणि मादकता मात्र कायम असते.

चहूंकडे पांढरेंशुभ्र स्वच्छ चांदणें पडलें होतें. मी आणि निना कारंजाच्या कठड्यावर बसलों होतों. कारंजांतल्या पाण्याच्या पृष्ठभागावरील निम्या ठिकाणीं झाडाच्या फांदीचें प्रतिबिंब दिसत होतें. आणि बाकीच्या निम्या ठिकाणीं चांदणें पडलें होतें. चांदणें पडलेल्या भागांतील पाणीही चकाकत होतें आणि फांदीच्या प्रतिबिंबानें कृष्णवर्णांकित झालेलें पाणीही चकाकत होतें, पण त्या दोहोंच्याही चकाकण्यांत बराचसा फरक होता. माझ्यावर मघाशीं घेतलेल्या मद्याच्या एकाच प्यालयानें पूर्ण अम्मल चढविला होता. माझ्या गात्रांत कांहींशी शीथिलता तर कांहींशी उन्मादता ओथंबलेली होती. निनाचा हात माझ्या हातांत होता. मृदु गंध-सुगंध लहरींनीं मी भारावला गेलों होतों—अगदीं पूर्ण धुंद होऊन गेलों होतों मी.

कधींच न उपभोगलेल्या प्रेमाच्या विरहानें व्यथित झालेल्या तिच्या मनाची सारी तगमग आजपर्यंत तिच्या चेहऱ्यावर दिसत होती. आत्तांच्या माझ्या सान्निध्यानें तिच्या चेहऱ्यावरील ती तगमग नाहींशी

झालेली स्पष्ट दिसून आली मला. कारंजाच्या कठड्यावर बसून ती माझ्याकडे टक लावून पाहात होती. तिच्या नेत्रांत शोधक आर्तता भरपूर भरलेली होती.

अतीशय उच्च दर्जाच्या सेंटच्या अनाघ्रात बाटलीचें झाकण काढावें म्हणजे पहिल्या क्षणाला त्याच्या उद्दाम गंध सुगंधानें मन भारावून मोहून जात नाहीं कां? तद्वतच, तिच्या त्या मोहक, अनास्वादित अवखळ यौवनानें मी मोहून गेलों होतों. त्या वेळच्या रुचिर चंद्र-प्रकाशानें, शांत सुरम्य रात्रीच्या सुषमेनें आणि निनाच्या सहवासानें माझ्या मनाची व शरिराची सारी तगमग नाहींशी झाली होती. तिच्या उन्मादी साहचर्यानें माझें मन बेसुमार चाळवलें गेलें अन् ताबा चालविणें अशक्य झालें मला माझ्या मनावर! निनाच्या सह-वासानें माझ्या भावनांना आलेल्या बहराची धुंदी साऱ्या नसा-नसांतून, वृत्तींवृत्तींतून संचरत होती. शरिराला आणि मनाला पूर्ण बेभान करण्याचं सामर्थ्य तिच्या अवखळ, अनास्वादित यौवनांत होतं.

निनाचा हात माझ्या हातांत होता. निना आपण होऊनच माझ्या जवळ सरकली. तिच्या मांसल शरिराचा स्पर्श माझ्या शरिराला झाला.

वाऱ्याची लहानशी झुळूक तरळली! त्या लहानशाच वाऱ्याच्या झुळुकीनें बागेंतील सारा सुगंध एकदम दरवळला! त्या सुगंध लहरींनीं मी जास्तच बेभान झालों. निनाला मी आणखी थोडंस जवळ ओढलं. तिच्या वृत्ती थराथरत होत्या, आणि माझ्या वृत्ती धुंद झाल्या होत्या. त्या धुंदींतच मी तिच्या कोमल तन्वंगांभोवतीं माझे हात लपेटून

घेतले. तिच्या हातांची मिठी माझ्या मानेभोंवतीं बसली होती. तिचा तो पिंगट भुरका केशभार माझ्या खांद्याशीं खेळत होता. तिच्या गुबगुबीत, मांसल, पक्व सफरचंदाच्या पृष्ठभागाप्रमाणें गुलाबी असलेल्या मोहक गालाशीं मी माझा गाल भिडवला. माझ्या गालाला झालेल्या तिच्या गालाचा प्रदीर्घ स्पर्शानें माझ्या शरिरावर उन्मादी रोमांच उभे राहिले. तिची हनुवटी मी धरली. आणि त्या मोहक चिंचोळ्या हनुवटीशीं माझी हनुवटी मी मिसळली. आणि....आणि....??—

शशिकलेच्या पहिल्या मीलनांतील मधुरता या मीलनांत नव्हती, संपूर्ण लोपलेली होती. आणि मादकता मात्र भरपूर सांठून राहिलेली होती. ती परिणत–परिणत होत होती.

यावेळीं माझ्या गात्रांत कामही सळसळत नव्हता. आणि प्रेमभावही सळसळत नव्हता. उन्माद मात्र भरपूर ओसंडत होता. उन्माद—! उन्माद—!! उन्माद!!!

खरं प्रेम, खरं मीलन पहिलंच! दुसऱ्यावेळीं त्यांतली सारी मधुरता नष्ट झालेली असते.

उगाच नाहीं गटेनें लिहीलें.—

"The first love is the only love, and by the second the highest sense of love is already lost."

# प्रकरण १३ वें—निखारा.

**शशिकलेनें लिहिलेली हकीकत:—**

चंद्रकांतांना निर्वाणीचं पत्र पाठवून पंधरा दिवस होऊन गेले तरी, त्यांच्याकडून उत्तरच कसं येईना! त्यांच्या पत्रासाठीं मी किती उत्सुक झालें आहे! दररोज टपालाचे वेळीं मी अधीरतेनें दरवाजांत उभी राहते; पण पोष्टमन्‌च्या "न" कारानें अत्यंत निराश होऊन पुन्हां आंत परत येते. वाट तरी किती पाहायची पत्राची! जीव कसा अगदीं अधीर होऊन जातो. दुष्काळांतून उठलेला प्राणी अन्नाला हापापत नाहीं कां, तश्शी हापापले होते मी चंद्रकांतांच्या पत्रासाठीं. चंद्रकांतांकडून निरोपाचा एक जरी शब्द आला, तरी यावेळीं त्याची किंमत माझ्या दृष्टीनें लाखमोलाची ठरेल.

दैवाचा खेळ उलट बाजूनें खेळला जात होता. जणूं माझ्यावर सरतापुरता सूडच उगवून घेत होतें दैव! एकतर चंद्रकांतांकडील कांहींच हालचाल कळेना, आणि दुसरें म्हणजे दादांनीं माझ्या लग्नाचें निश्चित करण्याचा चंगच बांधला होता.

चंद्रकांतांना पुन्हा एक अत्यंत निर्वाणीचं पत्र पाठवावं असं मला वाटलं, पण पुन्हा विचार केला, कदाचित ते अडचणींत असतील. अन् अडचणींतून मार्ग काढण्यासाठीं धडपडतही असतील ते! तेव्हां

ाज नाहीं उद्यां खात्रीनें ते मला बोलावून घेतील; मग त्यांना तरी ाय अर्थ आहे त्रास देण्यांत?

   

बरोबर अकरा दिवसांनीं मी "सौभाग्यवती" होणार! दादांनीं शेकस्त करून लग्नाचा मुहूर्त कायम केला. साखरपुडा वगैरे प्राथमिक वेधी आटोपून घेण्यांत आले.

कुंकुमपत्रिका वाटण्याची घाई जोरानें सुरू झाली. घरांत बायकांची येण्याजाण्याची वर्दळ सुरू झाली! कुणी शेवया वळूं लागतात, तर कुणी गव्हले, वळवट वळायला बसतात. लाडू वळायला आणि पापड, सांडगे घालायला तर "लाल फौज" सज्ज होती. मसाला, मेतकूट, भाजणी यांचीं दंगल उडत होती.

मैत्रिणींचा तरी काय घोळका जमे माझ्या भोंवतीं! माझ्या जन्मांत इतक्या मैत्रिणी कधीं एकावेळीं जमल्या आहेत असं आठवेनाच मला! आणि सारी चर्चा माझ्या लग्नाची! कुणी माझी चेष्टा करते आहे, कुणी मला उखाणे शिकवण्याचा प्रयत्न करते आहे.—माझ्या मस्तकांत तिडीक उठे त्यांची ती धांदल पाहून.

मी मनानें चंद्रकांतांना वरलं होतं. चंद्रकांतांशीं माझं लग्नच झालं होतं. एकमेकांनीं आपलं अंत:करण एकमेकांना बहाल केलं होतं! "लग्न" या शद्बाचा खरा अर्थच लोपला आहे हल्लीं. वैदिक विधीनुसार जाहीरपणें वधुवरांनीं एकमेकांच्या कंठांत माला घातल्या म्हणजे झालं लग्न!—पण छे; "लग्न" या शब्दाचा खरा अर्थच फार भिन्न आहे. संस्कृत "लग्" या धातूपासून 'लग्न' हा शब्द

प्रचारांत आला आहे. मग या शब्दाचा नीट पृथक्करणात्मक विचार केला तर लग्न कशाला म्हणायचें हें कळून आल्याविना राहील का?

"लग्न" या शब्दाच्या खऱ्या अर्थानुसार पाहतां स्टेशनवरील चाळींतच चंद्रकांतांशीं, ते गांवीं जाण्याच्या दिवशीं माझं 'लग्न' लागलं होतं.

वधुवरांनीं आपापसांत अशा रीतींनीं लग्नें लावल्याचीं उदाहरणें पुराणांत नाहींतच असं मुळींच नाहीं.

मी चंद्रकांतांना पुन्हां एक अत्यंत निर्वाणीचं पत्र लिहीलं. फक्त सात दिवस राहिले होते आतां. हे सात दिवस संपून गेले, कीं झालं—संपलं माझं पूर्वायुष्य असं म्हणायला हरकत राहाणार नाहीं. हीच शशिकला पांडे निराळ्या नावानें जगांत वावरणार! अंत:करणांत कशी काहिली होते आहे सारखी!

वैदिक विधींचा टेंभा मिरवणारे आमचे हे वाडवडील, अन् त्यांना पुष्टी देऊन स्वत:ची पोळी भाजून घेणारे सनातनी वेदांची अक्षरश: विटंबना करीत असतात.

**"समानीव आकूति:समाना हृदयानिव:**
**समानमस्तु वो यथाव: सुसहासति."**

विवाहविधीच्या वेळीं भटांच्या तोंडून म्हटल्या जाणाऱ्या या उक्तीचा अर्थ किती जणांच्या लक्षांत असेल? हाच मंत्र बडबडणाऱ्या त्या भटांना तरी त्याचा अर्थ माहीत असेल का?

तोंडानें उच्च तत्वांची घोषणा करायची, अन् कृतीनें मात्र या

साऱ्या तत्वांना गाडायचं,—त्यांची गळेचेपी करायची अशी ही आमची रूढी आहे.

आतां माझा धीर सुटत चालला. माझ्या दुसऱ्याही पत्राचें उत्तर चंद्रकांतांकडून आलें नाहीं. माझ्या तोंडचें पाणीच पळालें. चंद्रकांत मला विसरले तरी नाहींत ना, अशीही एक पुसटशी कल्पना अंतःकरणांत उद्भवली माझ्या, पण ती क्षणभरच ! दुसऱ्याच क्षणीं तें अशक्य आहे याची जाणीव झाली माझ्या मनाला !

फक्त तीन दिवस राहिले होते. वराकडील वऱ्हाडी मंडळींही आलीं होतीं.

मला राहवेना. जीव गुदमरूं लागला. निवांत वेळ मिळाला, कीं माझ्या नेत्रांना अश्रूंच्या धारा लागत. गालांवरून खालीं ओहळत जाणाऱ्या माझ्या अश्रूंच्या त्या तुटक धारेंत मला माझ्या भावी, तुटक आयुष्याचीं चित्रें दिसूं लागत, अन् त्याच्या योगानें मी जास्तच भेदरून जाई. दरदरून घाम सुटे माझ्या सर्वांगाला.

अश्रूंच्या सरीवर सरीवर ओहळत होत्या. हळूं हळूं त्या ओसंडूं लागल्या. ओसंडत जाणाऱ्या अश्रूचा एक थेंब ओहळत ओह-ळत माझ्या उत्तंगावर पडला. एकदम एक विलक्षण चमक माझ्या सर्व गात्रांतून चमकली. मी क्षणमात्र विभ्रमून गेलें. शरीरावर अननुभवी रोमांच उभे राहिले.

उत्तंगावर झालेल्या अश्रू—स्पर्शाच्या जाणिवेनें असह्य वेदना होत असल्याचा भास झाला मला. माझ्या उत्तंगाद्वयावर चिमट्यांचा

मारा करावा अशीही एक भावना तरळली.–किती तरी वेळ मी त्या विभ्रमस्थितींत होतें.—

मी उठलें, केस वगैरे साफसूफ केले. अन् दादांना एक पत्र लिहिलं मी. त्या पत्रांत चंद्रकांतांवर माझं प्रेम असल्याचा आणि त्यांच्याशींच विवाह करण्याच्या निश्चयाबद्दलचा साद्यंत मजकूर अगदीं स्पष्टपणें लिहिला होता मी. पत्र लिहून झालं. मी तें पुन्हां एकदां वाचलं. कां–कोण जाणे, पुन्हां पुन्हां वाचून काढलं मी–नंतर पाकिटांत घालून बंद केलं.

तें पत्र घेऊन दादांच्या खोलींत पाय ठेवला मी, समोरच दादा हातांत नोटांचं पुडकं घेऊन खुर्चीवर बसलेले दिसले मला. त्यांना पाहतांच भीति वाटली मला. माझा ऊर धडधडूं लागला. पत्र देऊं नये असंही वाटलं मला त्याक्षणीं.....पण—

दादा खोलींत नसतील असं मला वाटलं होतं तें पत्र घेऊन जातांना मला. पण माझा अंदाज चुकीचा ठरला. धैर्यानें पुढें गेलें. कापऱ्या हातानीं मी तें पत्र दादांच्या पुढ्यांत टेबलावर टाकलं–नव्हे, माझ्या हातांतून पत्र गळून पडलं, तत्क्षणीं मी परत फिरलें.

पळालें, धूम पळत सुटलें मी! मी माझ्या खोलींत आलें. खोलीचं दार लावून घेतलं, आंतून कडी घातली. अंथरूण पसरलं अन् अंग टाकून दिलं मी! तोंडावरून रग ओढला. दरदरून घाम सुटूं लागला माझ्या सर्वांगाला.

दादांची पत्र घेतेवेळेची ती चमत्कारिक दृष्टी, आणि माझं तें पत्र, या दोन्ही गोष्टी माझ्या दृष्टीसमोर नाचूं लागल्या.

## चंद्रकांतानें लिहीलेली हकीकत.

तारुण्यांतल्या उन्मादी उर्मि उताला आल्या होत्या. शशिकलेच्या सहवासांत या उन्मादी उर्मि मर्यादित होत्या. शशिकलेच्या सान्निध्याची दृढ जाणीव सतत माझ्या अंतर्यामांत जोंपर्यंत तेवत होती, तोंपर्यंत शशिकलेव्यतिरिक्त दुसऱ्या कुठल्याही तरुणीकडे मी अभिलाषित अपेक्षेनें पाहिलं नव्हतं. परंतु इथें आल्या पासून मी शशिकलेच्या सहवासाला अंतरलों होतों. शशिकलेच्या स्मृतींनीं माझं अंत:करण विदारून जाई. वरचेवर होणाऱ्या स्मृतीच्या आघातांनीं विरहदु:ख दुणावे अन् जीव व्याकळून जाई. शशिकलेच्या सहवासाची आसक्ती बळावली होती. ज्या, मी शशिकलेच्या सहवासांतला आनंद मनसोक्ततेनें लुटला होता त्याच मला आतां इथं आल्यापासून 'आपण इथं एकटेच आहोंत' याची तीव्र जाणीव झाली. माझ्या भावनाप्रधान अन् स्त्रीसुलभ मनाला ही एकलेपणाची जाणीव अती त्रस्त करी, भेडसावी. आणि अशा वेळीं उठावं, खूप जोरानें पळत पळत—नव्हे, पंख असते तर भराऱ्या मारीत जाऊन शशिकलेला धरावं, घट्ट कवटाळावं आणि तिच्या मुखमंडलाकडं पाहात एकलेपणाची आग शमवावी असं वाटूं लागे पण—पण—? ?

परिस्थितीच्या पायबंदानें मी इथं जखडला गेलों होतों. पैसा मिळणें फार दुर्मिळ झालें होतें मला.

मला आठवतं आहे. इथं आल्यानंतर मला एकदां पैशाची जरूरी भासली. अत्यंत बिकट अशा अडचणीच्या स्थितींत त्यावेळीं मी

होतों. अन् म्हणूनच कुठें तरी पैसे मिळतील कां, या वेड्या आशेनें मी भटकत होतों. यावेळीं मला माझ्या लिखाणाबद्दलची जाणीव झाली अन् म्हणून मी तत्काल मानसशास्त्राचे आधारावर एक छोटीशी, सुटसुटीत लघुकथा लिहून काढली. लघुकथा पूर्ण झाल्यावर ती घेऊन एका नवीनच निघूं लागलेल्या मासिकाच्या संपादकांकडे गेलों. त्यांच्या हातीं त्या लघुकथेच्या हस्तलिखिताचीं पानें दिलीं.

"दोन तीन दिवसांनीं निकाल सांगेन." संपादक म्हणाले.

मी परतलों. अन् पुन्हा दोन तीन दिवस झाल्यावर त्यांच्याकडे गेलों. माझी लघुकथा पसंत असल्याचें सांगितलें त्यांनीं. मी पैशाच्या अडचणींत होतोंच. यावेळीं कुणी मला एक रुपाया दिला असता तरी मी धन्यता मानली असती. साहजिकपणेंच मला संपादकांच्या उद्गारानें आनंद वाटला. मी त्यांना मोबदल्याबद्दल विचारलें.—

"आम्ही खांडेकरांशिवाय कुणाला मोबदला देत नसतों."

मी थक्क झालों त्यांचे ते उद्गार ऐकून आणि रागही आला मला त्यांचा.

"खांडेकराशिवाय कुणाचे लेखही घेत नसाल मग आपण." मी त्यांना जरासं रुष्टपणेंच विचारलं. अन् त्यांच्या उत्तराची वाटही न पाहतां मी परतलों.

त्या मासिकाच्या संपादकांचं एक मोठं दुकान होतं. त्या दुकानच्या जाहीरातीप्रीत्यर्थ त्यांनीं आजपर्यंत बराचसा खर्च केल्याचें माहीत होतें मला. मी त्यांना एक पत्र अती निर्भीडपणें लिहीलं. त्यांत

"खांडेकरांना पांच रुपये देत असाल, तर मला एक रुपाया देण्यास काय हरकत आहे?" असंही लिहीलं मी, आणि इतर ठिकाणीं जाहीराती देऊन खर्च करण्यापेक्षां स्वतःच्याच मासिकांत दुकानची जाहीरात करून दोन्ही डाव एका घावांत साधणाऱ्या त्यांच्या व्यापारी-काव्याचाही मी उल्लेख केला होता त्या पत्रांत.

माझं तें निर्भीड पत्र वाचून संपादकांनीं माझी लघुकथा मला "साभार परत" केली. परत करतांना मला त्यांनीं पत्र दिलं.

"प्रिय महाशय :—

लेखकांना मोबदला देण्याइतकी प्रस्तुत मासिकाची आर्थिक परिस्थिति सुधारली नाहीं हें कळविण्यास मला दुःख होत आहे."

त्यांच्या झब्बुगिरीची अन् ढोंगीपणाची मला शिसारी आली. पदरीं चार पांच नोकर बाळगणाऱ्या, दररोज दुकानांत येण्यासाठीं बसायला मोटार लागणाऱ्या इसमाला एका अडचणींत सांपडलेल्या साहित्यिकाला केवळ एका रुपयाची मदत करण्याची इच्छा होऊं नये?—कां तें अशक्य होतं त्यांना?

अशा अडचणीच्या स्थितींत असतांना मी शशिकलेच्या भेटीला, एकलेपणाची आग शमविण्यासाठीं कसा जाऊं शकणार? परिस्थितीच्या पायबंदानें मी जखडला गेलों होतों. "स्थितीचा असे किंकर प्राणि मात्र" या उक्तीची स्मृति झाली मला.

   

हॅवेलॉक एलीस, फ्राईड आणि हर्बर्ट स्पेन्सर या तत्वज्ञान्यांची

मानसशास्त्रावरील पुस्तकं मी पूर्वी वाचलीं होतीं. त्यांत मनुष्य वेडा कसा बनतो याचीही बरीचशी माहिती होती.

शशिकलेच्या सहवासाला हापापलेला, पण तिच्या सहवासाला अंतरलेला मी,—यावेळची माझी जी मनःस्थिति होती तीच परिणत झाली म्हणजे हळूहळू वेडाच्या लहरी उद्भवूं लागतील याची खात्री झाली.

याचवेळीं निनाची ओळख झाली. तिच्या सहवासांत शशिकलेच्या स्मृतींनीं मनाला होत असलेली तगमग नाहींशी झाल्यासारखी वाटे. थोडासा विरंगुळाच वाटे मला तो.

निनाच्या सान्निध्याला सततपणा लाभूं लागला. अन् अखेरीस शशिकलेच्या सहवासाला हापापलेल्या, त्यावेळच्या माझ्या त्या अतृप्त, भावनाप्रधान आणि यौवनसुलभ लालसेनें निनाच्या त्यावेळीं लाभलेल्या त्या एकांत सहवासांत आपल्या अतृप्तेची असह्य आग शमवून घेतली.

गडकऱ्यांच्या सुधाकराची दारूचा पहिला पेला घेतेवेळेची आणि माझी, निनाच्या सहचर्यांतली यावेळची भावना एकच असूं शकेल असं म्हणतां येईलं काय?

झाल्या गोष्टीमुळें शशिकलेवरील प्रेम नाहींसं झालं असं मुळींच नव्हे, तर उलट प्रेमाची भावना निराळी, अन् ही लालसा निराळी अशी माझी ठाम समजूत आहे.

लालसा ही क्षणैक सुखाच्या पूर्ततेसाठीं प्रबळ होते, तर प्रेमाच्या भावनेंत शाश्वत सुखाची अपूर्तता भरलेली असते. तद्वतच लालसा

शारिरीक सुखाच्या अपूर्ततेमुळें जागृत होते, तर प्रेम हें मानसिक सुखाच्या पूर्ततेसाठीं स्फुरत राहते. श्री. ग. त्र्यं. माडखोलकरांनीं "मोह म्हणजे उमलतांच गळून पडून कोमजणारे पारिजातकाचें फूल, अन् प्रेम म्हणजे कधींच न कोमजणारे कल्पलतेचें फूल" असें म्हटलें आहे, तेंच खरें आहे.

प्रत्येक तरूण व्यक्तीच्या भावना या इंदूप्रमाणेंच शीतल, तर सिंधू प्रमाणेंच उच्छृंखल, चंदनाच्या सुगंधाप्रमाणें मोहक, तर नागिणीच्या फूत्काराप्रमाणें दाहक असतात. मानवजातींचे सत्यत्व आणि सातत्य कायम टिकून राहावं म्हणूनच स्त्री–पुरूष हा भेद निर्माण झाला असणं शक्य आहे. अर्थात् जोंपर्यंत स्त्रींत स्त्रीत्व आहे आणि पुरुषांत पुरुपत्व आहे तोंपर्यंत एकमेकांची ही अभिलाषित लालसा प्रदीप्तच राहणार आणि लालसापूर्ततेसाठीं त्यांचे अहर्निश प्रयत्नही चालू राहणारच. निसर्गप्राप्त घडून येणाऱ्या गोष्टी आहेत या. पण म्हणून एवढ्यावरून ही लालसा म्हणजेच प्रेम असं समजणं चूक आहे. प्रेमीव्यक्तीव्यतिरिक्त इतर ठिकाणीं लालसेची पूर्तता झाली म्हणजे प्रेमाला मूठमाती मिळाली असं समजणंही मूर्खपणाचंच होय. निदान मला तरी तसं वाटतं. अर्थातच निनाच्या सान्निध्यांतील अतिप्रसंगानें शशिकलेवरील माझं प्रेम कमी झालं, किंवा तें हिणकस ठरलं असं मुळींच वाटत नाहीं मला. उलट तें पूर्वीं होतं त्याच प्रमाणांत आजही कायम आहे. मी तरुण आहे, भावनाप्रधान आहे. माझ्या भावनाप्रधान यौवनसुलभ मनावर तत्कालीन घेतलेल्या मद्याचा,

आजूबाजूच्या उन्मादी वातावरणाचा, उचिर चंद्रप्रकाशाचा, शांत सुरम्य रात्रीच्या सुषमेचा आणि परिणत तारुण्यानें मुसमुसलेल्या निनाच्या त्या अनास्वादित अवखळ यौवनाचा परिणाम झाला. सर्व गात्रांतून उन्मादी उर्मी सळसळल्या. त्या उर्मींना ऊत आला.

तापल्या दुधावर नियंत्रण ठेवतां नाहीं आलं, तर तें उताला येतं ना, अगदीं तश्शी स्थिति झाली होती माझी. मला माझ्या वृत्तींवर नियंत्रण ठेवणं अशक्य झालं होतं त्यावेळीं. तें माझ्या आटोक्या-बाहेरचं होतं. अर्थात् नियंत्रणाअभावीं जें घडून येतं तेंच घडून आलं.

उन्मादाची प्रबलता! उन्मादाची प्रखरता!!

उन्माद! उन्माद!! उन्माद!!!

   

उन्मादाबद्दलचे हे विवेचनात्मक विचार सुचण्याचं कारण असं कीं, ज्या दिवशीं निनाच्या सहवासाचा मी उन्मादून उपभोग घेतला त्याच्या दुसऱ्याच दिवशीं मी शशिकलेला पहिल्या टपालानें पत्र पाठविलं. शशिकलेला सर्व कांहीं गोष्टींचा संपूर्ण खुलासा होईल अशाच स्पष्ट भाषेंत मी पत्र लिहीलं. पत्र लिहीतांना कांहींही छपवायचं नाहीं असा निश्चयच केला होता.

माझ्या या पत्राला तिच्याकडून उत्तर आलं; पण माझं अंत:करण विदारलं गेलं तिच्या पत्रानें. जळजळीत निखाऱ्याचा चटका बसला माझ्या हृदयाला त्या पत्रवाचनानें. माझं पत्र पोहोंचण्यापूर्वी "माझं चंद्रकांतांवर प्रेम आहे, चंद्रकांताशींच लग्न करायचं आहे मला."

असं स्पष्टपणें तिनें आपल्या वडिलांना कळविलं होतं म्हणे. पण माझ्या या पत्रानें तिला माझा तिरस्कार वाटूं लागला. माझ्याबरोबर विवाह करण्याचा निश्चय तिनें बदलला आणि माझ्यावर व स्वतःवरही सूड घेण्याच्या इरादानें तिनें लग्नाला मान्यता दिली. आणि त्याबद्दलचें सविस्तर हकीकतीचें मला पत्रही पाठवून पुन्हां पत्रव्यवहार न करण्याबद्दलची तिनें कठोर आज्ञाही केली होती. तिच्या त्या आत्मघातकी विचाराची कींव आली मला, आणि वाईटही वाटलं.

आपल्या पत्राला माझ्याकडून उत्तर यावं अशी तिची अपेक्षा नव्हती. आणि उत्तर धाडावं अशी माझीही इच्छा नाहीं. अर्थात् मी नाहीं तिला पाठविलं पत्र.

तें लग्न फिसकटलं, दुसरीकडे खटपट केली तिच्या वडिलांनीं. दुसरं स्थळ घाईकरून पसंत केलं आणि एका शुभ मुहूर्तावर तिचं लग्न झालं.

तिच्या आयुष्यांतला तो शुभमुहूर्त, पण मला तो अशुभ होता. त्या दिवशीं——

"तिची चमेली फुलली, माझी भाग्यलता वठली."

त्यानंतर कांहीं दिवसांनीं मला कळलं, कीं शशिकलेच्या पतीला लग्नापूर्वीं क्षयरोग जडला होता. आज शशिकला एका क्षयरोग्याशीं आपल्या संसारांत रमून जाण्याचा प्रयत्न करते आहे.

   

निनावर माझं प्रेम नव्हतं; नाहींही! शशिकलेवर माझं प्रेम आहे.—अद्यापिही आहे.

शशिकलेनें माझ्या प्रेमाचा अव्हेर केला. पण तरीसुद्धां मी तिच्यावर प्रेम करतों आहें. माझं तिच्यावरील प्रेम अणुमात्र कमी झालं नाहीं. कमी होणं शक्य नाहीं.

निनाच्या तत्कालीन लाभलेल्या सहवासांत माझ्या अपूर्त भावनेच्या पूर्तीचा क्षणैक आनंद मला लाभला असला, तरी निनाचा सतत सहवास मला मनस्वी जाचकच होणार हें उघड आहे. निनाचं माझ्यावर प्रेम आहे वा नाहीं हें मला माहीत नाहीं. निनाविषयीं मला आदर वाटतो, सहानुभूति वाटते हें मला कबूल आहे. मात्र प्रेम नाहीं माझं तिच्यावर!

शशिकलेवर प्रेम आहे, पण ती मला सोडून गेली. आतां मी या जगांत एकटा—एकटाच राहिलों. यापुढील माझं जीवन—निष्प्रेम जीवन!

प्रेम—प्रेम!!

छे, शक्य नाहीं. मागून मिळण्यासारखी वस्तू नाहीं! ती मिळवावी लागते.

जगांत जगायचं कशासाठीं? प्रेमासाठीं! जगाचा पसारा कशाच्या जोरावर चालतो? प्रेमाच्या! उत्पत्ति, स्थिति आणि लय या प्रत्येक चराचरांमागें लागलेल्या अवस्था कशासाठीं आहेत? प्रेमासाठीं.

ज्याच्या पूर्ततेसाठीं तपश्चर्या करावी लागते, ज्याच्या जोपासनेसाठीं आत्म्याचें दान करावें लागतें आणि ज्याच्यासाठीं सुखाशा सोडून जन्मभर वेड्यासारखें भटकण्यांत, पोटापाण्याचे हाल सोसण्यांत, तद्वतच मरण्यांतही जीवनाचें साफल्य मानावें अशी एकच भावना—प्रेम! प्रेम!!

प्रेम करावं, प्रेमानें वागावं आणि त्यांतच समाधान मानून आयुष्याचा व्यय करीत राहावं.

सारं खरं; पण मी आतां कुणावर प्रेम करूं? कुणाच्या तोंडाकडे पाहून मनाचं समाधान करून घेऊं? तसं कुणी आहे कां? छे, शक्य नाहीं. माझ्या शशिकलेविना दुसरं प्रेमाचं माणूस मला भेटणं शक्य नाहीं.

वेदना! वेदना!! वेदना!!!

असह्य झाल्या या प्रेमनिराशेच्या वेदना!

निराशा! प्रेमनिराशा!!

प्रेमाची पूर्ती निराशेंतच होणार. त्याच निराशेंत प्रेमाची शाश्वतता भरलेली असते. त्याच दाट निराशेंत आशेचा किरण सदैव प्रकाशित असतो म्हणे.

कुणाला माहीत खरं कीं खोटं आहे? आतां अनुभव घेणं भाग आहे या गोष्टींचा.

वियोगांत हालाहलाची दाहकता साठलेली असते ही गोष्ट मात्र अक्षरशः खरी आहे.

   

या साऱ्याचं मूळ उन्माद! उन्माद हा ज्वलत निखाऱ्यासारखा दाहक असतो.

प्रत्येकाच्या अंतर्यामांत उन्माद अवश्य सळसळत असावा. पण तो मर्यादित असावा.

उन्माद नसलेला पुरुष पुरुषत्वहीन! आणि उन्माद नसलेली स्त्री स्त्रीत्वहीन!

## निखारा

निखारा मर्यादित असतो तोपर्यंत तो तारकच असतो, पण मर्यादे-बाहेर गेला, भडकला, कीं तो मारक होतो हेंच खरं. मर्यादित निखाऱ्यापासून ऊब मिळवितां येईल, अन्न शिजवतां येईल. पण भडकलेल्या निखाऱ्यापासून कांहींही मिळवितां येणं शक्य नाहीं.

उन्मादाचंही असंच नाहीं का?

उन्माद आणि निखारा!

उन्माद! उन्माद!! उन्माद!!!

